


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.
ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.
ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.






अनुक्रमणिका

॥ श्री ॥




वर्ष ६८ वें ] सप्टेंबर १९३७ [ अंक ९ वा

## अनुक्रमणिका



किरकोळ अंक किंमत ८ आणे. वार्षिक वर्गणी ( आगाऊ ) ट. हं. सह ३ रुपये.



# मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय

महाराष्ट्राला अत्यंत भूषणास्पद होऊन राहिलेल्या ज्या कांहीं हाताच्या बोटांनीं मोजतां येण्याजोग्या संस्था आहेत, त्यांमध्यें मुंबई येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचा प्रामुख्यानें निर्देश केला पाहिजे. या संग्रहालयामध्यें अन्यत्र पहावयास न सांपडणारे बहुतेक सर्व जुने दुर्मिळ मराठी ग्रंथ संग्रहित असून केवळ मुंबई शहरांतीलच नव्हे, तर बृहन्महाराष्ट्रांतील मराठी भाषेच्या अभ्यासकांना त्यांचा फार उपयोग होत असतो. नुकताच या संस्थेचा अडतिसावा वार्षिकोत्सव साजरा झाला. या प्रसंगीं बडोद्याचे साहित्यभक्त रा. दाजी नागेश आपटे यांनीं अध्यक्ष या नात्यानें केलेलें भाषण 'विस्तारा'च्या गेल्या अंकांत प्रसिद्ध झालेलेंच आहे. यंदा चालकांनीं केलेला एक नवा उपक्रम म्हणजे या संस्थेची उपयुक्तता कशी वाढेल व तिची स्थिति कशी सुधारेल यासंबंधीं चर्चा करण्याकरितां सभासदांचें भरविलेलें स्नेहसंमेलन होय. या वेळीं गायन, वादन व कॉफीपान यांचाही कार्यक्रम होता. संमेलनांत झालेल्या चर्चेंमध्यें कांहीं भाषणें संस्थेच्या प्रस्तुत परिस्थितीची व अडचणींची चांगल्या प्रकारें कल्पना करून देणारीं होतीं, तर कांहीं भाषणांत बेजबाबदारपणा, व्यवहारशून्यता व पोरकटपणा यांपलीकडे कांहींच नव्हतें! याच वेळीं "मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या हितचिंतकांच्या विचारासाठीं" म्हणून "एक हितचिंतक" या सहीचें एक छापील पत्रक वांटलें गेलें. त्या पत्रकाच्या मुळाशीं लेखकाचा सद्हेतुच होता याबद्दल वाद नाहीं; परंतु त्यांपैकीं कांहीं सूचना संस्थेच्या ध्येयाच्या विरुद्ध व अत्यंत विघातक स्वरूपाच्या होत्या. "ग्रंथालयाचा कोणालाही स्वल्प मुदतीकरितांही वाजवी मोबदला देऊन फायदा घेण्याची सोय व्हावी...प्रवासी, धंद्यानिमित्त व अन्य कारणाकरितां मुंबईत अल्प काळ राहण्यास आलेल्या लोकांनाही योग्य मोबदला देऊन प्रवेश मिळणें सुलभ व्हावें," अशासारखी सूचना स्वीकारार्ह नाहीं असें कोण म्हणेल? अशी सोय आज जर संस्थेच्या नियमांत नसेल, तर ही तिला अत्यंत लांच्छनास्पद गोष्ट आहे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयावर केवळ मुंबईकरांचाच नव्हे, तर महाराष्ट्रांतील किंबहुना जगांतील सर्व मराठी अभ्यासकांचा हक्क आहे हें आपणास विसरतां येत नाहीं. समजा, एखाद्या नागपूरच्या अभ्यासकाला चारदोन दिवस या ग्रंथसंग्रहालयाचा फायदा घ्यावयाचा आहे, तर तेवढ्याकरितां त्यानें कायम वर्गणीदार व्हावें काय? असें झालें तर गरीब मराठी अभ्यासकांवर महाराष्ट्रांतील प्रत्येक संस्थेचा सभासद होण्याची पाळी येईल!

सदर पत्रककर्त्यांच्या घातुक सूचना सांगावयाच्या म्हणजे, "संग्रहालयासंबंधींचा व्यवहार...धंद्याची दृष्टि सतत पुढें ठेवून" करावा; 'ग्रंथालयानें मागील वहिवाटीप्रमाणेंच पुस्तकांचा संग्रह न करतां वेळोवेळीं लोकांची अभिरुचि अजमावून तीप्रमाणें संग्रह करीत जावा;" "मराठी पुस्तकांप्रमाणेंच ताजीं ताजीं इंग्रजी पुस्तकें व मासिकें ग्रंथसंग्रहालयांत ठेवावीं.' वगैरे. लोकांचें आरोग्य सुधारण्याकरितां म्हणून स्थापन केलेल्या दुग्धमंदिरांत लोकांची गर्दी लोटत नाहीं म्हणून व्यापारी दृष्टीनें चहा-चिवडा किंवा ताडीमाडी ठेवण्याच्या सूचनेसारखाच कांहींसा हा अनिष्ट प्रकार आहे! "सभासदांस आकार देऊन (संग्रहालयांत) चहाफराळ

( कव्हर पेज नं. ३ पाहा. )



श्री

# विविधज्ञानविस्तार

वर्ष ६८, अंक ९ सप्टेंबर १९३७.

## शिवाजीमहाराजांचीं वसतिस्थानें

शिवाजीमहाराजांच्या चरित्राच्या उत्तरार्धातील महत्वाच्या गोष्टी कोणत्या वेळीं घडल्या, हें आतां निश्चितपणें सांगतां येतें. परंतु त्यांच्या आयुष्यांतील पूर्वार्ध म्हणजे अफजलप्रसंगापूर्वीचा वृत्तांत अंद्याप अनिश्चित स्वरूपांत आहे. अफजलप्रसंगापासून महाराजांच्या हालचालींकडे परकीय व शत्रुपक्षीय लोकांचें लक्ष लागलें, यामुळें इ. १६५९ पासून पुढील २१ वर्षांचा वृत्तांत समजून घेण्यास फारशी व (इंग्रजी वगैरे) युरोपीय भाषांतील समकालीन पत्रांचें साहाय्य मिळूं शकतें. पण ही मदत शिवचरित्राच्या पूर्वार्धाबद्दल मिळत नाहीं;हा पूर्वार्ध केवळ मराठी पत्रांच्या आधारें लिहावा लागतो. शिवाय बखरकारांनीं दिलेला पूर्वार्धविषयक वृत्तांत बराच काल्पनिक व विपर्यस्त असल्यामुळें शिवकालीन पत्रांतील एतद्विषयक मजकूर ध्यानांत घेण्यास बरीच अडचण भासते. तथापि विश्वसनीय साधनांच्या आधारानें कित्येक घडामोडींचा कालनिर्णय आतां ठोकळ मानानें करतां येतो. याचें उदाहरण म्हणून शिवाजीमहाराज लहानपणापासून राज्याभिषेक होईपर्यंत कोठकोठें राहत होते, म्हणजे त्यांचीं वसतिस्थानें कोणतीं, हें ठरविण्याचा प्रयत्न करतों.

महाराजांचा जन्म शिवनेरीच्या किल्ल्यावर झाला व माहुलीच्या वेढ्यानंतर मोगलांशीं तह झाला तेव्हां शिवनेरीचा किल्ला शहाजीनें मोंगलांच्या ताब्यांत दिला आणि या वेळीं किंवा या वेळेपर्यंत शहाजीच्या कुटुंबांतील मंडळी शिवनेरीला राहत होती असा उल्लेख पादशाहनाम्यांत आहे. यावरून जिजाबाई व शिवाजी यांचें राहणें या सहा वर्षांत शिवनेरीच्या किल्ल्यांत होतें.

यानंतर शहाजीच्या ताब्यांतून शिवनेरीचा किल्ला गेला व शहाजी विजापूरकरांचा नोकर बनला; तेव्हां त्याला पुणें प्रांताचा मोकासा मिळाला व त्यापैकीं कर्यात मावळचा पोटमोकासा शिवाजीच्या नांवानें करण्यांत आला (खं. १८, पृ. ४४). शिवाय मावळाचा कांहीं भाग जहागिरीदाखल मिळाला; त्यांत खेडेबारें शहाजीच्या ताब्यांत आलें. दादाजी कोंडदेवाचें राहाणें तेथून जवळच कोंडाण्यावर असे; यामुळें जिजाबाई व शिवाजी यांना कसबे खेड येथें ठेवण्यांत आलें. तेव्हां ते बापूजी मुद्गल नऱ्हेकर यांच्या वाड्यांत राहत होते (पुरंदरे द. भा. ३ पृ. १३०). पुढें यांच्याकरितां तेथें स्वतंत्र वाडा बांधण्याचें ठरलें; तेव्हां कसब्यांतील कांहीं वाण्यांचीं व कुळांचीं घरें उठवावीं लागलीं व या कुळांना वसाहतीला जागा द्यावयाची होती म्हणून कसब्याच्या शिवारांत कांहीं अंतरावर नवी पेठ वसविण्यांत आली; व त्या पेठेचें नांव 'शिवापूर' असें ठेवण्यांत आलें. बालशिवाजीच्या नांवें ही जी शिवापूरची पेठ वसविण्यांत आली, तेथें राहणाऱ्यांना बारा वर्षेपर्यंत अनेक प्रकारच्या सवलती दिल्या होत्या. यामुळें तेथें चांगली वस्ति झाली.

अशा प्रकारें जिजाबाई व शिवाजी यांची वस्ति इ. स. १६३७ पासून कांहीं दिवस कसबे खेड येथें झाली असतां शहाजी कर्नाटकच्या स्वारींत गुंतला होता. त्याला तेथें बंगळूरचा किल्ला जहागिर मिळाला व नंतर तो १६३९ मध्यें देशीं आला




अनुक्रमणिका

( प. सं. ले.४५३ ); तेव्हां परत तो बंगळुरास गेला. नंतर जिजाबाई व शिवाजी ही मंडळी त्याच्याबरोबर गेली होती ( शि. भा. अ. ९ श्लो. ६० ). यानंतर शिवाजीच्या बाराव्या वर्षी म्हणजे इ. १६४१ मध्यें पुण्याकडील भागाची जहागीर शिवाजीच्या नांवें करण्यांत आली व तो आईसह बंगळुराहून देशीं आला. तेव्हां त्याचें राहणें कसबे खेड येथें होतें व यानंतर शिवाजी एक व त्याचा वडील भाऊ संभाजी याचा एक असे दोन वाडे पुण्यांत बांधण्यास सुरवात झाली असावी. ( प. द. भा. २२ ले. २९२ ) नंतर इ. स. १६४४ मध्यें शहाजी देशीं आला होता तेव्हां त्याच्यावर व दादाजी कोंडदेवावर विजापूर दरबाराची गैरमर्जी झाली; ( प. सं. ले. २४९८ ) परंतु त्यांच्यावरील आरोप खोटा ठरून शहाजीची रवानगी पुनः कर्नाटकांत झाली. पुढें शिवापूर वसविल्यापासून १० व्या वर्षी म्हणजे इ. १६४६ मध्यें दादाजी कोंडदेव शहाजीच्या भेटीसाठीं खेडेबाऱ्यांतून निघून तिकोट्यावरून बंगळुरास गेला. त्या वेळेपासून खेडेबारें तर्फेवर शिवाजीच्या नांवानें दिलेले हुकूम सांपडतात (प. सं. ले. ५१०). बंगळुराहून दादाजी परत आल्यानंतर आजारी पडला व इ. १६४७ च्या जुलैच्या सुमारास मरण पावला. या वेळीं शहाजी कर्नाटकांत स्वारीवर गुंतला असल्यामुळें पुणें व खेडेबारें येथील व्यवस्था लावण्याचें काम शिवाजीकडे आलें; व या सुमारास त्यानें कोंडाण्याचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. परंतु तो त्याला या वेळीं पचला नाहीं. कारण शहाजीची कैदेंतून सुटका करण्यासाठीं शिवाजीला कोंडाणा व त्याबरोबर खेडेबारें व शिरवळ येथील ठाणीं देखील विजापूरकरांच्या ताब्यांत द्यावीं लागलीं (पुरं. द. भा. ३, पृ. १३१ ). तेव्हांपासून शिवाजीराजे यांची वस्ति खेडकसब्यांतून हालून पुण्यास गेली.

इ. स. १६४९ ते १६५३ पर्यंत चार पांच वर्षे शहाजी व संभाजी देशीं म्हणजे पुणें ते विजापूर भागांत होते. अर्थात् तेव्हां शहाजी व शिवाजी यांचें अधूनमधून पुण्याकडे एकत्र रहाणें असावें. या वेळीं शहाजीच्या ताब्यांत हिरडस मावळचा भाग होता व तेथील व्यवस्था शिवाजी पाहत असे ( प. सं. ले. २५७१). शिवाजी हा शहाजीच्या तर्फेचा व्यवस्थापक हें नातें इ. स. १६५५ पर्यंत टिकलें. त्यानंतर शिवाजीमहाराजांच्या स्वतंत्र हालचाली सुरू झाल्या. त्या सुमारास महाराजांचें ठाणें पुण्याहून पुरंदरच्या किल्ल्यावर नेण्यांत आलें. ही गोष्ट इ. स. १६५४ च्या ऑगस्टनतर झाली यांत शंका नाहीं ( प. सं. ले.६७३ ), परंतु नंतर म्हणजे कोणत्या महिन्यांत हें सांगण्यास साधन नाहीं. पुढें इ. १६५७ मध्यें महाराजांनीं खेडेबारे ( व कोंडाणा )या भागांत पुनः अम्मल बसविला व राजगड तोरणा येथें किल्ले बांधण्यास सुरवात केली आणि तेथें ते राहूं लागले. संभाजीचा जन्म इ. स. १६५७ च्या मे महिन्यांत पुरंदर येथें झाला, यावरून तोंपर्यंत त्या किल्ल्यावर महाराजांचें राहणें असावें असा तर्क करतां येतो. पुढें इ. स. १६५७ पासून शिवाजीराजे राजगडास राहूं लागले.

राजगड येथें त्यांचें ठाणें पुष्कळ वर्षे टिकलें. कारण रायगडावर घरें व तळीं बांधण्यास इ. स. १६७१-७२ मध्यें सुरुवात झाली ( प. सं. ले. १४५९ ), त्याअर्थी त्यानंतर मराठी राज्याचें ठाणें रायगडावर गेलें व तो किल्ला राजधानीचें शहर बनला. अर्थात् इ. स. १६७२ ते १६८० पर्यंत महाराजांचीं फक्त शेवटचीं आठ वर्षे रायगडास गेलीं. अशा रीतीनें शिवाजीमहाराजांच्या वसतिस्थानांचा अनुक्रम ठोकळ मानानें सांगतां येतो तो असा—

| | |
|---|---|
| इ. स. १६३०-६ | शिवनेरी |
| इ. स, १६३७-९ | कसबे खेड |
| इ. स, १६४०-४१ | बंगळूर |
| इ. स. १६४२-४९ | कसबे खेड |
| इ. स. १६४९-१६५५ | पुणें |
| इ. स. १६५६-१६५७ | पुरंदर |
| इ. स. १६५८-७१ | राजगड |
| इ. स, १६७२-८० | रायगड |

वसतिस्थानांच्या अनुक्रमाच्या दृष्टीनें सांगितलेले हे कालखंड शिवचरित्रांतील घडामोडींच्या दृष्टीनें देखील महत्त्वाचे टप्पे आहेत. पण या लेखाचा तो विषय नसल्यामुळें येथें त्यांचें वर्णन करण्याचें कारण नाहीं.

**द. वि. आपटे**

---




अनुक्रमणिका

# जर्मनीची शासनपद्धति

महायुद्धोत्तर जगांत, रशियांतील समाजसत्तावादी पक्षानें पूर्व युरोपांत आपलें वर्चस्व इतक्या झपाट्यानें बसविलें होतें कीं, आतां पाश्चात्य युरोपीय राज्यपद्धति कायमचीच नष्ट होते कीं काय व आतां सर्वत्र क्रांतिकारक समाजसत्तावादी पक्षाच्या शासनपद्धती-व्यतिरिक्त दुसरा तरणोपाय नाहीं अशीच कल्पना सर्व लोकांची होऊं लागली; आणि ती बहुतांशीं खरी होती. महायुद्धाच्या आंचेनें शांतिब्रह्माचे पुतळे लोण्या-प्रमाणें विरघळून गेले. व्हर्सेल्सच्या तहानें मित्रसंघानें जर्मनी व इतर जित राष्ट्रें, त्यांच्या वसाहती, व्यापार व उद्योगधंदे पद्धतशीरपणें नष्ट करण्याचें धोरण आंखिलें होतें, तर रशियानें झारशाहीला रसातळास पोहोंचवून शेतकरी-कामकरी पक्षाचें वर्चस्व स्थापण्याचें कार्य रंगारूपाला आणलें होतें. महायुद्धानें गतप्रभ व निष्प्राण झालेल्या जित राष्ट्रांचे डोळे रशियाच्या नव्या राज्यशासनपद्धतीनें आकर्षित केले होते, इतकेंच नव्हे, तर समाजसत्तास्थापनेशिवाय, व रशियाचें अनुकरण करून ती पद्धति स्वीकारल्याशिवाय आपलें चालावयाचें नाहीं, अशा तऱ्हेची विचारसरणी युरो-पीय जनतेंत रशियाच्या हस्तकांकडून व इतर विचार-वंत अर्थशास्त्रज्ञ व राजकारणी लोकांकडूनही प्रसृत केली जात होती, यांत शंका नाहीं.

रशियांतील नव्या समाजसत्तावादी पक्षाला आपली संघटना व पक्षबल वाढविण्याकरितां प्रचारकार्य मोठ्या प्रमाणावर करावें लागलें. इंग्लंड, फ्रान्स वगैरे लोक-सत्तावादी राष्ट्रांनीं त्या राज्यपद्धतीविषयीं जाणूनबुजून गैरसमज पसरविण्याचें कार्य भांडवलवाल्या लोकांच्या साहाय्यानें चालविलें होतें. मध्ययुरोप व इतर महा-युद्धांत निर्बल झालेल्या राष्ट्रांत, निराशायुक्त वातावरण खेळत होतें. प्रचारकार्याची दुधारी सुरी आपलें बल वाढविण्याला जशी कारणीभूत होते, तशीच विनाश-काल जवळ आणण्याला कारणीभूत होते. सत्ता, सामर्थ्य, व संपत्ति हीं अतिरिक्त प्रमाणांत वाढलीं, कीं मनुष्यांचा तसाच राष्ट्रांचा नाश करण्याला कमी करीत नाहींत; आणि जशी मनुष्याची Destiny-दैवी घटना असते, तशीच राष्ट्रांचीही असावी अशी कल्पना लॉर्ड मोर्ले यांच्याप्रमाणें मनांत येते. जगाच्या इतिहासावर वरवर जरी अवलोकन केलें, तरी याच विचारसरणीचा मनावर पगडा बसल्याशिवाय राहत नाहीं.

कोठें आहे तें वैभवशाली रोमन साम्राज्य? केवढी त्याची थोरवी व केवढी त्याची संस्कृति? कोठें गेलीं तीं इजिप्त व बॅबिलोनियन राष्ट्रें व त्यांची "पिरॅमिड व स्फिंक्स"नें शाश्वत झालेली संस्कृति? खाल्डियन् संस्कृति नष्ट झाली! आतां हिंदुस्थानकडे पहा. अशोकादि राजे लयाला गेले व त्यांचीं राष्ट्रें नष्ट झालीं. विजयानगरचें साम्राज्य केवढें वैभवशाली, पण कालाच्या विशाल उदरांत गडप झालें! "सर्वं यस्य वशादगात् श्रुतिपथं कालाय तस्मै नमः।" हेंच सुभाषित अखेरीस आपल्याला आठवतें. असो. म्हणण्याचा आशय असा कीं, सर्वभक्षक कालाच्या विशाल पोटांत राष्ट्रें व साम्राज्यें नष्ट झालीं आहेत, त्यांची फक्त अवशेष स्मृति तेवढी एखादा इतिहास-संशोधक पोथ्या, नाणीं, घटादि भांडीं, स्तूप वा शिला-लेख यांच्या साहाय्यानें जागृत करण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत असतो!

### मध्ययुगीन जर्मनी

जर्मन राष्ट्राचा उदय व जर्मन संस्कृतीचा उत्कर्ष हा अगदीं अलीकडचा आहे. अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत सुद्धां एकराष्ट्रीयत्वाची भावना व स्वदेशप्रेमाची कल्पना जर्मन लोकांत नव्हती. महा-युद्धापूर्वीच्या जर्मनीची स्थिति निर्माण होण्याला जर्मनीच्या सत्ताधाऱ्यांना फार परिश्रम करावे लागले होते. त्या वेळीं मध्ययुरोपांत स्वतंत्र संस्थानें, लहान लहान टोळ्यांचे संघटित विभाग, अगर लहान प्रांत अस्तित्वांत होते. हल्लींच्या जर्मनीच्या अस्तित्वाची जाणीव, नद्या व शहरांचीं नांवें अथवा सॅक्सनी,




अनुक्रमणिका

वव्हेरिया, वर्टेन्बर्ग यांसारख्या प्रांतांच्या' नांवांवरून व्हावयाची. पूर्वीचें "पवित्र रोमन साम्राज्य" अस्तित्वांत होतें व सत्ताधारी धार्मिक गुरु राजाची योजना करीत; पण (House of Habsburg) हप्सबर्गच्या राजघराण्यांतील राजपुरुषाची गादीवर स्थापना होई. राजसभा (Diet) अस्तित्वांत होती, पण तिला कोणीच विचारीत नसे. नामधारी लोकांची ती चर्चेची बैठक झाली. प्रत्येक संस्थान पूर्ण स्वतंत्र असे. मात्र ते बाह्यात्कारी तसें दाखवीत नसत. "पवित्र रोमन साम्राज्य" इतकें खिळखिळें व निर्बल झालेलें होतें कीं, नेपोलियनच्या एकच घावांत तें नष्ट झालें. एका प्रख्यात लेखकानें असें म्हटलें आहे कीं, तें पवित्र नव्हतें व रोमनही नव्हतें व साम्राज्य म्हणाल तर नव्हतेंच नव्हतें!* इतकी अवनतावस्था तत्कालीन रोमन साम्राज्याची झाली होती.

### प्रशियाची प्रगति

इ. स. १६५० पर्यंत प्रशिया व आस्ट्रिया हीं दोन जर्मन संस्कृतीचीं प्रमुख राष्ट्रें पूर्णपणें सुप्तावस्थेंत होतीं. होएनझोलर्न (Hohenzollern) घराण्यानें आपली सत्ता पूर्व प्रदेशावर प्रस्थापित करून जर्मनीची संघटना करण्यास सुरुवात केली. १७०१ मध्यें "प्रशियाचा बादशहा" असा किताब धारण केला व पूर्वीचा "elector of Brandenburg" (ब्रॅन्डेनबर्गचा प्रमुख) ह्याचा त्याग केला. पुढच्या काळांत फ्रेड्रिक धी ग्रेट हा गादीवर आला. (१७४०-१७८६) त्याच्या अर्धशतकाच्या अमदानींत प्रशियांत एकराष्ट्रीयत्वाची भावना दृढमूल होऊन वाढीला लागली. फ्रेड्रिकनें ऑस्ट्रियाचा मोठा लचका तोडला, लहान लहान स्वतंत्र संस्थानें आपल्या राज्याला जोडून नव्या वर्धिष्णु जर्मन राष्ट्राची उभारणी केली. तरी सुद्धां लोकांत गुलामगिरीची पद्धति व जुनी सरंजामपद्धति अस्तित्वांत होती.

फ्रान्समधील राज्यक्रांतींतून नेपोलियनचा उत्कर्ष झाला व त्यानें "जीना व टिल्सिट" (Gena & Tilsit) हीं घेतल्यावर सारें मध्ययुरोप त्याच्या अमलाखालीं आलें; व पूर्वीचें वैभवशाली पवित्र रोमन साम्राज्य इ. स. १८०६ मध्यें रसातळास गेलें !

नेपोलियनच्या विरुद्ध ह्या जर्मन संस्थानांनीं इतर राष्ट्रांना मदत केली; व वाटर्लूच्या समरांगणावर नेपोलियचा वेलिंग्टननें पूर्ण पराजय केल्यावर, व्हिएन्नाच्या काँग्रेसनें ऑस्ट्रियाच्या अधिकाराखालीं जर्मनीला त्याचे जुने प्रांत परत केले. अशा रीतीनें ३८ संस्थानांचें संयुक्त राष्ट्र बनलें. सन १८१५ नंतर ह्या संयुक्त संस्थानांचें हळूहळू एकत्रीकरण होऊं लागलें. "डाएट" अस्तित्वांत आली, संस्थानिकांचे प्रतिनिधि त्यांत बसूं लागले, व राष्ट्राचें संरक्षण करण्याचे संपूर्ण अधिकार त्यांना देण्यांत आले; परंतु नवे कर लादणें अगर कमी करणें ही सत्ता त्यांच्या हातांत नव्हती. आणि कोणतीही गोष्ट सर्वांच्या पूर्ण संमतीनें व्हावयाची असल्यामुळें असें एकमत क्वचितच होई !

ऑस्ट्रिया व प्रशिया यांची कोणत्याच बाबतींत एकी होत नसे. त्यामुळें ह्या "डाएट"मध्यें निरनिराळ्या प्रतिनिधींना आपापसांतील वितंडवादी चर्चेशिवाय दुसरें कोणतेंच काम नसे. अशा परिस्थितींत एकराष्ट्रीयत्वाची भावना कशी निर्माण होणार, हाच मोठा प्रश्न होता. आणि जेथें जेथें प्रतिनिधित्व नामधारी असून सत्ता दुसरीकडे केंद्रीभूत झालेली असते, त्या त्या ठिकाणीं या राष्ट्रीय सभांना निव्वळ चर्चामंडळाचें (Debating Society) स्वरूप येतें, व त्या इतर राष्ट्रांच्या थट्टेचा व विनोदाचा विषय होऊन बसतात.

फ्रेड्रिक धी ग्रेटच्या अमदानींत प्रशियाचें वर्चस्व वाढण्याला सुरवात झाली, ती पुढें भराभर

* "At best a loose federation of sovereign principalities, the Empire was, in the witticism of Voltair, neither holy, nor Roman, nor yet in any proper sense an empire at all."
—Governments of Europe



सारखी वाढत चालली. लोकांत नवचैतन्य दिसून येऊं लागलें व जर्मन संस्कृति, भाषा व राष्ट्र यांबद्दल आपलेपणा वाटूं लागलेला दिसून येतो.

### ४ था फ्रेड्रिक वुइल्यम्

इ. स. १८१६ ची व्हिएन्ना कॉंग्रेसनें सुरू केलेली राज्यघटना अस्तित्वांत आली. निरनिराळ्या संस्थानांनीं आपलीं संस्थानी विधिमंडळें स्थापन केलीं. तथापि ऑस्ट्रियाच्या प्रधानाचें–प्रिन्स मेटरनिच् ( Prine Metternich ) चें वर्चस्व ह्या सर्व संस्थानांमध्यें अबाधित राहिलें. जवळ जवळ २० वर्षेंपर्यंत ऑस्ट्रियानें सर्व सूत्रें आपल्या हातांत ठेवून लोकसत्ता नामशेष करण्याचें धोरण ठेविलें होतें.

त्यानंर प्रशियाचा ४ था फ्रेड्रिक वुइल्यम यानें तत्कालीन "डाएट" ( Diet ) ला अधिकार देण्याचा घाट घातला. इ. स. १८४७ मध्यें त्यानें सर्व संस्थानांच्या विधिमंडळाचें संयुक्त* "डाएट" बोलाविलें. परंतु जेव्हां निरनिराळ्या संस्थांचे प्रतिनिधि जमून हक्क व सत्ता यांची चर्चा करूं लागले, तेव्हां वुइल्यमनें त्यांना हडसून खडसून सांगितलें कीं, " राजकीय संस्थांची योग्यता मीं पूर्णपणें जाणतों. राजसत्ता व परमेश्वर यांच्यामध्यें राज्यघटनेच्या कागदी घोड्यांना मी नसती ढवळाढवळ करूं देणार नाहीं! " Never, " he declared, " would I allow, to come between Almighty God in heaven and this land, a blotted parchment, to rule us with paragraphs, and to replace the ancient, sacred bond of Loylty. " आणि तो इतकें म्हणून थांबला नाहीं; तर त्या प्रतिनिधींना " डाएट "मधून हांकून लाविलें! याचा परिणाम सर्व संस्थानांमध्यें बंडाचा वणवा उठला. फ्रान्समध्यें १८४८ ची क्रांति झाली, तेव्हां जर्मनींतील बंडाचा जोर वाढला.

### सुधारणावादी पंथाचा उत्कर्षापकर्ष

ह्या बंडाच्या लाटेमुळें प्रत्येक संस्थानिक आपलें सिंहासन डांसळतें कीं काय या विचारानें लोकपक्षाशीं सहमत करावयाला तयार झाला. सुधारणावादी-पक्षाचा जोर वाढत असल्यामुळें नवी राज्यघटना अंमलांत येण्याची शक्यता दिसूं लागली. स्वतंत्र जर्मन राष्ट्राची निर्मिति या वेळीं दृग्गोचर होऊं लागली. परंतु या पक्षाची संघटना असावी तशी नव्हती. राजसत्तात्मक घटना असावी, कीं पूर्ण-लोकसत्तात्मक पद्धति असावी, कीं संयुक्त संस्थानांची एकत्र घटना असावी, या संबंधानें त्यांच्यामध्यें बरेच पक्षोपपक्ष झाले होते. सन १८४८च्या मे महिन्यांत जेव्हां " फ्रँकफर्ट-ऑन-धीमे-न " ( Frankfort-on-the-Main ) या ठिकाणीं लोकप्रतिनिधींची सभा भरली, त्या वेळीं राष्ट्रीय घटना संमत होऊं शकली नाहीं! पक्षोपपक्षांची चर्चा व घटनेचा शाब्दिक छल यांमध्यें महिनेच्या महिने गेले; यादरम्यान स्वतंत्र संस्थानिक शेफारून गेले व त्यांनीं लोकप्रतिनिधींना धाब्यावर बसवून सर्व सत्ता आपल्या हातांत घेतली.

इ. सन १८४९ मध्यें संयुक्त संस्थानांची घटना व दोन राष्ट्रसभा व सत्ताधारी मंत्रिमंडळ आणि वयांत आलेल्यांना मताधिकार अशी घटना मोठ्या कष्टानें ठरविण्यांत आली, तेव्हां प्रशियाच्या राजानें लोकांनीं दिलेला राजमुकुट तिरस्कारानें नाकारला. प्रशिया काय अगर ऑस्ट्रिया काय, ह्या मोठ्या संस्थानांनीं लोकशाहीची गळचेपी करून राष्ट्रीय घटना जन्मतःच उध्वस्त करून टाकली. तेव्हांपासून सुधारणावादी पक्षाची पिछेहाट सुरू झाली, ती महायुद्धापर्यंत. त्यानंतर १० वर्षेंपर्यंत या पक्षाचा उदय झाला तो नाझी अंमलापर्यंत टिकला.

## 'पोलादी सत्ताधारी' प्रिन्स बिस्मार्क

" Iron Chancellor " प्रि. बिस्मार्कनें आपल्या आठवणींत ह्या सुधारणावादी पक्षाच्या

* " Vereinigter Landtag or United diet."






अनुक्रमणिका

हातून कांहीं होऊं शकणार नाहीं, खरी सुधारणा प्रबल सैनिक करूं शकतील, अशी ग्वाही दिली आहे.* राजकारणी, मुत्सद्दी, विद्यार्थी व कवि अगर तत्त्वज्ञानी यांच्या हातून राष्ट्रोद्धार कधींच होऊं शकणार नाहीं, अशी या "पोलादी सत्ताधिकाऱ्याची" कल्पना होती, म्हणून त्यानें राष्ट्रीय सैन्याची पुनर्घटना करून तें प्रबल व पोलादी बनविलें. प्रशियाचें प्रधानपद मिळाल्यावर (इ. सन १८६२) प्रि. बिस्मार्कनें जर्मन संस्थानांतून ऑस्ट्रियाचें उच्चाटण करण्याचें ठरविलें. "एका म्यानांत दोन तरवारी राहूं शकत नाहींत." प्रशिया व ऑस्ट्रिया हीं तुल्यबल संस्थानें असल्याकारणानें या संस्थानांतून एकाची तरी पूर्ण हकालपट्टी झाल्याशिवाय एकराष्ट्रीयत्वाची भावना बद्धमूल होणार नाहीं, या उद्देशानें प्रि. बिस्मार्कनें डाव टाकण्याला सुरवात केली.

इ. स. १८५० मध्यें प्रशियाची घटना निर्माण झाली होती; पण ती बिस्मार्कच्या बेताच्या आड येऊं शकली नाहीं. राजाला सांगून त्यानें लोकप्रतिनिधि-सभांना कायमचीं कुलुपें ठोकण्याचा सल्ला दिला. बहुमत व महिनेच्या महिने चालणाऱ्या चर्चा, यांनीं जर्मन राष्ट्राची एकी होणार नाहीं; तेव्हां या सभासदांची कांहीं जरूरी नाहीं हें त्यानें जाणलें, म्हणूनच सर्व सत्ताधिकार स्वतःच्या हातीं घेऊन त्यानें चार वर्षेंपर्यंत हवी तशी करवाढ केली व सैन्य सुसज्ज करून पुढील संधि केव्हां मिळते याची वाट पाहूं लागला. आणि 'इच्छा असेल तर मार्ग मिळतो,' या न्यायानें ऑस्ट्रियाच्या उच्चाटणाची संधि त्याला प्राप्त झाली. इ. सन १८६४ मध्यें डेन्मार्कशीं युद्ध करण्याकरितां ऑस्ट्रियाला प्रोत्साहन देऊन सर्व संस्थानांत बजबजपुरी माजली आहे, अशा सबबीवर संयुक्त संस्थानांची संघटणा करण्याची एक योजना प्रिन्स बिस्मार्कनें आंखिली. अर्थातच ती "हप्सबर्ग" घराण्याच्या राजसत्तेची सत्ता कायमची संपुष्टांत आणणारी असल्यामुळें ऑस्ट्रियानें त्याला कसून विरोध केला, आणि हवी होती ती संधि प्रि. बिस्मार्कला या वेळीं मिळाली! सन १८६६ मध्यें आपल्या पोलादी सैन्याचा लोंढा ऑस्ट्रियावर फेंकून त्यानें बेसावध असलेल्या शत्रूचा चुटकीसरसा संपूर्ण व सणसणीत पराजय केला.

### संयुक्त संस्थानांची पुनर्घटना

या युद्धाचा परिणाम असा झाला कीं, सर्व लहान लहान संस्थानें प्रशियाला भिऊं लागलीं, आणि ऑस्ट्रियाची जर्मन संस्थानांतून हकालपट्टी झाली! ऑस्ट्रियामध्यें जर्मन संस्कृतीमध्यें वाढलेले जर्मन लोक पुष्कळ होते; पण त्यांना ह्या नव्या संयुक्त जर्मनीमध्यें प्रवेश मिळूं शकला नाहीं, एवढीच एक वाईट गोष्ट झाली. प्रिन्स बिस्मार्कच्या धोरणामुळें बाकीच्या सर्व संस्थानांचा एक स्वतंत्र व अविरोधी गट निर्माण होऊन एकछत्री अंमल सुरू झाला.

प्रशियानें आपल्या नियंत्रणाखालीं मेन नदीच्या पलीकडील बावीस संस्थानांचा एक गट निर्माण केला होता. नव्या घटनेंत इतर जर्मन संस्थानांना येण्याचा दरवाजा मोकळा होता, तेणेंकरून "फ्रान्स-प्रशियन" युद्धामुळें बव्हेरिया, बेडनून, वर्टेम्बर्ग व हेसी–डार्मस्टॅट् या चार संस्थानांनीं प्रशियाशीं सहमत केलें. अशा प्रकारें जर्मनीच्या एकीकरणाला अप्रत्यक्ष मदत होऊन प्रिन्स बिस्मार्कचें धोरण यशस्वी झालें. इसवी सन १८७० मध्यें मिळालेल्या जयामुळें जर्मनीची स्वतंत्रता जगप्रसिद्ध झाली. १८ जानेवारी १८७१ मध्यें व्हर्सेलिसमधील १४ व्या लुईच्या आरसेमहालांत १ ला वुइल्यम् हा प्रशियाचा अध्यक्ष व जर्मनीचा बादशहा "Deutscher Kaiser"–

* Not even when the turmoil was greatest did I consider the situation "unfavourable," since the real barometer was not the noise of Parliaments great and small, but the attitude of the troops–the Iron Troops!

—Reflections and Reminiscences.

—Prince Bismark



अशी प्रकट घोषणा करण्यांत आली ! आणि जर्मनीचा बादशहा या किताबामुळें सर्व जर्मनीमध्यें एकराष्ट्रीयत्वाची लाट अभाविकपणें उसळून एकत्रीकरणाच्या चळवळीला जोर चढला.

पुढील चाळीस वर्षांचा कालावधि म्हणजे जर्मनीचा एकमेव उत्कर्ष होय. या काळांत जर्मनीची लोकसंख्या चार कोटी होती; ती साडेसात कोटी झाली. धंदा व कारखाने वाढले, व्यापार जगभर प्रसृत झाला; व नवीन वसाहती स्थापन झाल्या. विसाव्या शतकाच्या सुरवातीलाच आरमाराची पुनर्घटना होऊन तें इतकें वाढलें व जोमदार झालें कीं, त्याची गणना ब्रिटिश आरमाराच्या बरोबरीनें होऊं लागली. जर्मन व्यापारी व कारखानदार जगभर माल पुरवूं लागले व त्यांनीं राष्ट्रीय संपत्तींत अपरंपार भर टाकिली. कोठेंही जा, कोठल्याही बंदरांत पहा, जगाच्या बाजारांत जर्मन लोक, जर्मन वस्तु, जर्मन लोखंडी सामान व जर्मन रंग व औषधें, यांनीं भरून गेलेले तें दिसूं लागलें. ही परिस्थिति महायुद्धाच्या काळापर्यंत अनियंत्रितपणें सुरू होती. जगाच्या कारखान्यांत जर्मनीला हें जें मोठें स्थान प्राप्त झालें, त्याला कारण जर्मन लोकांची चिकाटी व त्यांना मिळालेलें राजकीय स्वास्थ्य होय, यांत शंका नाहीं. जर्मनीच्या वाढत्या भरभराटीमुळें युरोपांतील इतर राष्ट्रांच्या द्वेषाला व मत्सराला तें पात्र झालें. साम्राज्यसत्तेचा हव्यास व लष्करी वर्चस्वाचें धोरण लढाईला प्रवृत्त करतें, आणि लढाईतील पराभव म्हणजे राज्यक्रांति ! जर्मनीचा उत्कर्षापकर्ष हा राजकारणाच्या अभ्यासूंना मोठा उद्बोधक व चिंतनीय वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

## पूर्वीची जर्मन राज्यघटना

प्रिन्स बिस्मार्कनें एका सायंकाळीं एका कागदाच्या तुकड्यावर ती लिहून काढिली. तिच्यामध्यें व्यक्तीचे अधिकार अगर हक्क अथवा बिल ऑफ् राइटस् नाहींत; पूर्वी १८६७ मध्यें जी एकतंत्री घटना होती, तीच १८७१ मध्यें अस्तित्वांत ठेविली, हें तरी जर्मनांचें नशीबच म्हणावयाचें. राजा, अध्यक्ष अथवा चान्सेलर व दोन सभा बंडस्‌रॅट् व रीश्टॅग् हीं अस्तित्वांत आलीं. प्रशियाचा राजा हा सार्वभौम बादशहा (Emperor) झाला, आणि (Bundesra) बंड (Bundesrat) ची सुधारून वाढविलेली आवृत्ति म्हणजेच नवीन रिश्टॅग् (Reichstag) होय. व्यापार, उद्योगधंदे, रेल्वे, पोस्ट, तारायंत्र, नाविकदल व सैनिक आणि आर्थिक सत्ता हीं राखींव खातीं राहिलीं, व त्या संबंधाचे कोणतेच अधिकार ह्या लोकप्रतिनिधि-सभांना नव्हते.

कोणतीही सुधारणा अगर निर्बंध बदलावयाचा अगर नवा करावयाचा, तर त्याला बंडस्‌रॅट् व रिश्टॅग् यांची संमति पाहिजे; आणि जर कोणत्याही निर्बंधाविरुद्ध चवदा मतें झालीं, तर हा कधींच संमत व्हावयाचा नाहीं. मुख्य गंमत तर ही कीं, सतरा मतें एकट्या प्रशियाचीं असावयाचीं, त्यामुळें प्रशियाच्या इच्छेविरुद्ध कोणताच निर्बंध संमत होणें शक्य नसे. अमेरिकेच्या राज्यपद्धतीमध्यें तेरा संस्थानांनीं मनांत आणलें तर एखादा नवा निर्बंध आणतां येतो, अगर जुना बदलतां येतो; पण जर्मनीमध्यें तें काम सतरा मतांच्या प्रशियाला केव्हांही करितां येतें ! अशा तऱ्हेच्या राज्यघटनेच्या निर्बंधांत स. १८७१ ते १९१४ पर्यंत फक्त अकराच सुधारणा सुचविण्यांत आल्या. १८७३ मध्यें जी न्यायशासनपद्धति मान्य करण्यांत आली, तीच पुढें १९०० मध्यें सर्व संस्थानांत दृढ झाली.

## इतर घटना व जर्मनी

प्रशिया व इतर संस्थानें यांची संयुक्त राज्यघटना ( Federal Constitution ) अस्तित्वांत आली. तथापि मुख्य सत्ता प्रशिया, बव्हेरिया अगर संस्थानें यांमध्यें नव्हती. राजकीय सत्ता (Sovereignty) संस्थानें व साम्राज्य यांमध्यें विभागिली गेली



होती. फ्रान्समध्यें सुद्धां सत्ता अशीच विभागिलेली आहे. अमेरिकन राज्यपद्धतींत सत्ता, संस्थानें व संयुक्त संस्थानें यांमध्यें विभागलेली आहे. प्रख्यात इतिहासकार क्रूगर यानें जर्मन सत्ता व्यक्तींमध्यें नाहीं, संस्थानांत नाहीं अगर साम्राज्यांत नाहीं; तर संयुक्त-संस्थानांत एकत्रितपणें अधिष्ठित झालेली आहे, असें स्पष्ट म्हटलें आहे.* परंतु शासनशास्त्रज्ञ जर्मन राज्यघटना फेडरल् आहे असेंच म्हणतात; आणि म्हणूनच अमेरिका, स्वित्झर्लंड अगर फ्रान्स यांच्या घटनेशीं जर्मन राज्यघटनेची नेहमीं तुलना केली जाते.

ही सत्तेची विभागणी अमेरिका व स्वित्झर्लंड या देशांप्रमाणें येथील राज्यघटनेच्या निर्बंधांत स्पष्टपणें नमूद केलेली आहे. कोणताही बदल करणें असेल, तर विधिमंडळाच्या पूर्ण बहुमतानें झाला पाहिजे, असा तिच्यामध्यें स्पष्ट उल्लेख आहे. इंग्लंडची राज्यघटना कागदोपत्रीं स्पष्ट झालेली नसल्यामुळें, त्यासंबंधीं कोणताच एक नियम सांगतां येत नाहीं; त्यामुळें ती अनियंत्रित आहे असा कोणीं गैरसमज करून घेऊं नये. सुधारलेल्या राष्ट्रांतील कोणत्याही राज्यघटनेपेक्षां इंग्लंडमधील राज्यघटना अत्यंत सोपी अशी भासणारी, परंतु तितकीच समजण्याला अत्यंत अवघड म्हणून मृगजळाप्रमाणें भासणारी अगर मुठींत समाविष्ट झालेल्या वाळूप्रमाणें स्रवणारी असून स्थलकालमानाप्रमाणें परिवर्तनशील आहे.

जर्मनींतील संयुक्त संस्थानी राज्यघटनान्वयें मुख्य अधिकार संयुक्त सरकारचे कोणते तें ठरविलें आहे; तेव्हां उरलेले अधिकार व्यक्तिगत संस्थानांचे होत.

अमेरिकेंतील राष्ट्रीय सरकारचे अधिकार ठरलेले आहेत. ते हे :—व्यक्तीच नागरिकत्वाचे हक्क, धंदा, व्यापार, उद्योगधंदा, पोस्ट, तार, रेल्वे खातीं, पेटंट व नाणीं, नाविकदल व व्यापारी दल, लष्कर, वजन वगैरेसंबंधीं पूर्णाधिकार या राष्ट्रीय सरकारचे आहेत. शिक्षण, चर्च व धर्म, पोलिस व इतर रस्ते, सडका व वैयक्तिक संस्थानांची राज्यपद्धति हीं त्यांचीं त्यांनीं ठरवावीं. असाच प्रकार जर्मनीमध्यें आहे. अधिकारांची आवश्यकता भासल्यास इतर संस्थानांकडून खंडणी ( Matricular beitrage or contributions ) वजा देणगी वसूल करण्याचा अधिकार संयुक्त राष्ट्रीय सरकारला आहे.

अमेरिकेमध्यें न्यायशासनपद्धति राज्यशासनपद्धतीबरोबरच अस्तित्वांत आली असल्याकारणानें एखादा विधिनिर्बंध न्याय्य व शासनशास्त्राप्रमाणें आहे किंवा गैर आहे हें ठरविण्याचा अधिकार न्यायमंडळांना आहे; तसा प्रकार जर्मनीमध्यें नसल्यामुळें तेथील राष्ट्रीय सरकारावर कोणतेंच नियंत्रण नाहीं.* त्याचा परिणाम असा झाला कीं, दिवसानुदिवस ह्या संयुक्त राष्ट्रीय सरकारची भूक अतिशयच वाढली व नवीनवी करवाढ व नवेनवे निर्बंध अस्तित्वांत आले, इतकेंच नव्हे तर, जर एखाद्या संस्थानाचा निर्बंध ह्या नव्या निर्बंधाशीं विरोध करणारा असला, तर तो निर्बंध अयुक्त अतएव निरर्थक ठरतो ! मध्यवर्ति सरकारचा कोणताही निर्बंध मात्र शास्त्रोक्त असल्यास तो कार्यवाहींत यावयाचाच !

## महायुद्धाची भीषणता !

जगाच्या बाजारांत जर्मनीची चलती होती, विद्युत्-सामान, यंत्रें, कांच व पोलाद, खनिज द्रव्यें ह्यांमध्यें जर्मनी आघाडीवर होता. ॐ औषधी द्रव्यें जगाला

* "The Sovereignty resided not in the individual states, nor in the Empire as such, and certainly not in the "people," but rather in the "totality of the states" as represented in the Bundesrat."

—Government of Politics of Germany, by F. C. Kruger. (chapter iv)

* "State Laws could be invalidated if in conflict with imperial laws, but the latter, if properly enacted and promulgated, could not be questioned."—Eropean Governments & Politics. 653 p. Prof. Ogg.




अनुक्रमणिका

जर्मनी पुरवीत होता, आणि एकंदर व्यापार गेल्या पन्नास वर्षांत पांचपट वाढला होता ! सतत प्रयत्न, दीर्घ परिश्रम व केंद्रीभूत सत्ता यांच्या जोरावर जर्मन राष्ट्र उन्नतीचें शिखर गांठीत होता; व तें त्याच्या दृष्टिपथांत आलें होतें. ता. २८ जून १९१४ रोजीं सर्व्हियाच्या हद्दींत एका १९ वर्षांच्या विद्यार्थ्यानें ऑस्ट्रियन् राजपुत्राला ठार मारलें व तोच महायुद्धाचा मुहूर्त ठरला ! त्या गोळीनें युरोपांतील वातावरण पूर्णपणें भरून गेलें, त्याच्या आवाजानें कानठळ्या बसणारा आवाज जगाच्या दाही दिशांना घुमूं लागला. अशा रीतीनें महायुद्धाला सुरवात झाली व सर्व युरोप शस्त्रास्त्रांच्या खणखणाटानें व दारूगोळ्यांच्या सरबत्तीनें हादरून गेला. त्या रणसंग्रामांत जर्मनीनें, कायसर वुइल्यम्‌सह निर्वेधपणें उडी घातली.

चार वर्षेपर्यंत शिपायापासून सेनापतीपर्यंत, राजापासून रंकापर्यंत, जर्मन लोक या लढाईंत अविरत लढत होते. जनरल गोअरिंग हा सुद्धां या लढाईंत पश्चिम रणक्षेत्रावर लढत होता. आजचा सर्वाधिकारी हर हिटलर हाही या युद्धांत मन:पूर्वक भाग घेत होता. सरतेशेवटीं अमेरिका युद्धांच्या क्षेत्रांत उतरली, तेव्हां जर्मन सैन्याची पिछेहाट झाली. हा इतिहास अगदीं ताजाच असल्यामुळें त्याची माहिती येथें सांगण्याचा मोह आवरून धरीत आहे. महायुद्धानंतर व्हर्सेलसच्या तहाची जड शृंखला जर्मनीच्या हातापायांत मित्रराष्ट्रांनीं इतकी करकचून घातली कीं, त्या भाराखालीं जर्मनी अगदीं मरणोन्मुख झाला !

### व्हर्सेलसची शृंखला !

प्रेसिडेंट विल्सनच्या चौदा तत्त्वांना धरून जर्मनींतील राजसत्ता व जुना साम्राज्यवादी पक्ष यांचा कायमचा मोड करण्यांत येऊन नव्या प्रजासत्ताक राज्यपद्धतीची घटना जर्मनीमध्यें स्वीकारण्यांत आली. सॅक्स-वीमर-इसॅक या परगण्याची वीमर ("Weimar") ही राजधानी असल्यामुळें, व आजपर्यंत लोकशाहीची चळवळ प्रशियाविरुद्ध याच भागांत विशेष असल्याकारणानें राष्ट्रसभा बर्लिन येथें न भरवितां "वीमर" येथें ६ फेब्रुवारी १९१९ मध्यें भरविण्यांत आली. "वीमर"ला दुसरें एक प्राचीन महत्त्व आहे; गटे व शिलर ( Goethe and Schiller ) हे सुप्रसिद्ध कवि व तत्त्वज्ञानी लोक येथेंच होऊन गेले. शिवाय बर्लिन येथें त्या काळांत नेहमींच दंगेधोपे होत असत; म्हणून दक्षिण जर्मनांच्या इच्छेनुरूप नव्या शाहीची मुहूर्तमेढ "वीमर" येथेंच रोंवण्यांत आली.

नव्या विधिमंडळांत १६३ सोशॅलिस्ट, ८८ खिश्चनपार्टी, ७५ डेमोक्रॅटिक, व ८० इतर तीन पक्षांचे सभासद होते. बरेच दिवसपर्यंत घटनामंडळाचें काम सुरू होतें. सरतेशेवटीं २६२ विरुद्ध ७२ मतांनीं ( व्हर्सेलसच्या तहाला मान्यता देऊन ) नवी घटना संमत झाली. रिश्टॅगची सभा वीमर येथें कांहीं दिवस भरे व पुढें सप्टेंबरपासून बर्लिन येथें भरत असे. नवी घटना ता. ११ ऑगस्ट १९१९ रोजीं घोषित करण्यांत आली.

युरोपांतील नव्या राज्यघटनेंत एक गोष्ट प्रामुख्यानें दिसून येते. ती ही कीं अमेरिकन पद्धति समोर ठेवून त्यामध्यें हवी ती भर घालून इष्ट घटना तयार करण्यांत येते. जर्मनीची ही घटना इतकी विस्तृत व सार्वत्र आहे कीं, अद्यापपर्यंत एवढी मोठी रिश्टॅग (Reichstag) राज्यघटना कोणत्याच देशाची नाहीं ! नवी घटना दुरुस्त करण्याला ⅔ बहुमत रिश्टॅगमध्यें पाहिजे, अथवा लोकमताची मान्यता त्याला मिळाली पाहिजे, तरच कोणतीही दुरुस्ती घडवून आणतां येईल.

लोकमतानें घटनादुरुस्ती करणें व लोकमताला नवे निर्बंध अस्तित्वांत आणण्याची मुभा असणें, हीं या जर्मन घटनेंतील महत्त्वाचीं तत्त्वें स्वित्झर्लंडच्या राज्यघटनेवरून घेतलेलीं दिसतात. १९१९-२८ पर्यंत पुष्कळ वेळां घटना दुरुस्त करण्याचे प्रसंग आले.



रिश्टॅग्मध्यें “ लँडर ” (Lander) चे प्रतिनिधि असावेत, पूर्वीप्रमाणें संस्थानांचे नसावेत. अद्यापपर्यंत प्रशिया हाच सर्व संस्थानांत प्रमुख होता, आणि जर्मन संस्थानें म्हणजे सिंह, कांहीं कोल्हे व बरेच उंदीर यांची मैत्री, अशीच वस्तुस्थिति होती. प्रशियाची विभागणी करण्याची योजना सिद्धीस जाऊं शकली नाहीं.*

'वीमर' घटनेप्रमाणें जर्मनीला प्रेसिडेंट व प्रधान-मंडळ मिळालें, व त्यांनीं आपल्या अधिकारांत राष्ट्राचा कारभार पाहावा अशी योजना सुरू झाली. सन १९२० मध्यें पहिल्या अध्यक्षाची निवडणूक झाली. पहिल्या अध्यक्षाच्या जागीं वीमर येथील जुन्या सभेचा अध्यक्ष इबर्ट याचीच निवडणूक झाली. तो १९२५ मध्यें, मुदत संपण्यापूर्वी कांहीं दिवस मृत्यु पावला. पुढील निवडणुकीला ७ लोक उभे राहिले. पण भरपूर पाठबळ न मिळाल्यामुळें कोणाचीच बहुमतानें निवड होऊं शकली नाहीं. तेव्हां फिल्ड मार्शल व्हॉन हिंडेनबर्ग या ७७ वर्षांच्या सेनापतीला निवडणुकीला उभें राहण्याची कांहीं पक्षांच्या संगतमतानें विनंती करण्यांत आली या वेळीं, सोशल डेमॉक्रॅटस्, सेंटर व प्रोग्रेसिव पक्षांनीं डॉ. मार्क्सला (Dr. marx) पाठिंबा दिला, तर कम्युनिस्ट पक्षानें थालमन् ( thalmaun ) याला मदत केली, तथापि हिंडेनबर्ग प्रचंड बहुमतानें अध्यक्ष म्हणून निवडला गेला. हिंडेनबर्गला १॥ कोटी मतें मिळालीं, १ कोटी ३७ लक्ष मार्क्सला मिळालीं, तर थॅालमन्ला १९ लक्ष मिळालीं. तीन उमेदवार या निवडणुकीसाठीं उभे राहिल्यामुळें मतदारांना योग्य निवड करतां आली नाहीं; त्यामुळें मार्क्स व थालमन् यांना दिलेलीं मतें फुकट गेलीं. इतकेंच नव्हे, तर हिंडेनबर्गच्या मतांपेक्षां तीं समुच्चयानें किती तरी अधिक आहेत. या बाबतींत अमेरिकेची, दोनच उमेदवार अध्यक्षांच्या निवडणुकीकरितां घेण्याची पद्धति फार सोयीस्कर आहे.

‘ वीमर ’ घटनेप्रमाणें तिसरी व शेवटची अध्यक्षाची निवडणूक सन १९३२ मध्यें झाली. त्या वेळीं हिंडेनबर्ग व हिटलर व थालमन हे तीन प्रतिस्पर्धी आखाड्यांत उतरले होते. प्रथम पांच उभे होते, पण पुढें दोघांनीं माघार घेतली. त्या वेळींसुद्धां हिंडेनबर्गला १ कोटी ९३ लक्ष, हिटलरला १ कोटी ३४ लक्ष व थालमन यास फक्त ३७ लक्ष मतें पडलीं ! अशा रीतीनें दुसऱ्यांदा हिंडेनबर्ग अध्यक्ष झाले. पण एक गोष्ट निश्चित झाली कीं, नाझीपक्षही कांहीं लहानसान नाहीं, आणि उपेक्षणीय तर नाहींच नाहीं. हीच गोष्ट पुढील हकिकतीवरून स्पष्ट होईल.

## नाझी पक्षाचा उदय

‘ वीमर ’ घटनेच्या पूर्ण तिरस्कारानें प्रेरित होऊन व व्हर्सेलिसच्या शृंखलेनें बद्ध झालेल्या लोकांना मुक्त करण्याचें ध्येय पुढें ठेवून नाझी पक्ष अस्तित्वांत आला. एका बाजूला रशियांतील काम्युनिस्ट तत्वज्ञान फैलावत होतें, व अर्धीअधिक जर्मन जनता त्या “ दुष्ट ” तत्त्वज्ञानाला बळी पडत होती; आणि जर त्यांचें संरक्षण केलें नाहीं, तर रक्तपात व क्रांति होऊन जर्मन राष्ट्र नष्ट होईल, ही भीति नाझींना वाटत होती. दुसऱ्या बाजूला पूर्वीच्या पुराणमतवादी पक्षाचीं व भांडवलशाही वर्गाचीं कारस्थानें व त्यांनीं संगनमतानें जर्मनीवर लादलेला हा अपमानकारक व्हर्सेल्सचा तह व त्याचें शब्दशः परिपालन केल्यामुळें जर्मन राष्ट्राची खच्ची होत आहे, व त्याला कारणीभूत ही “ वीमर-घटना ” आहे असा त्यांचा दृढ समज होता. व्हर्सेल्सचा तह फाडून व त्याचा चोळामोळा करून फेंकून द्यावा व स्वतंत्रतेनें चालावें असा त्याचा इरादा होता.

* Ex-President Lowell characterises the then federal structure thus, “It was a compact between a Lion, a half-dozen foxes, and a score of mice;” the Lion was Prussia. and the tiniest of the “mice” was the free City of “Bremen.

—Prof. Ogg, page 654.
Governments of Europe-Germany.




अनुक्रमणिका

रशियन कॉम्युनिस्टांच्या तत्त्वज्ञानाच्या विरुद्ध आपलें तत्त्वज्ञान प्रसृत करण्याचा उपक्रम हर हिटलरनें सुरू केला. समाजसत्तावाद व भांडवलशाहीवर्गाचा नाश, आणि शेतकरी कामकरी पक्षांचें ( Proletarian ) प्राबल्य व मध्यम व उच्च श्रीमंत वर्गाचा (Bourgeois) नाश हें ध्येय कॉम्युनिस्टांचें आहे. त्याकरितां मार्ग कोणता याचा विचारही करावयाला ते तयार नाहींत. रक्तपाताची क्रांति (Revolution) करूनही हें ध्येय कार्यवाहींत आणावयाचें व Dictatorship of the proletarian, ( शेतकरी-कामकरी पक्षांचें राज्य ) स्थापन करावयाचें हा त्यांचा मुख्य उद्देश. राष्ट्राच्या मालकीचे सर्व उद्योगधंदे, कारखाने, आगगाड्यादि वाहतुकीचीं साधनें, पोस्टादि व्यवस्था, शिक्षण, लष्कर, चर्च व धर्म हीं करावयाचीं, यांवर व्यक्तींची सत्ता ठेवावयाची नाहीं, वैयक्तिक मालमत्ता व संपत्ति, श्रीमंत धनिकवर्ग अगर मोठे व्यापारी, कारखानदार ह्यांनीं आपली सर्व मालमत्ता राष्ट्रांच्या मालकीची करावयाची आणि याविरुद्ध होणारी कोणतीही चळवळ जन्मतःच निष्ठुरपणें चिरडून टाकून एकतंत्री कामगारांचें राज्य रशियाप्रमाणें जगभर स्थापन करावयाचें असा त्यानें संकल्प केला. आणखी एक महत्त्वाचें तत्त्व त्यांच्या शिकवणींत दिसून येतें तें हें:---व्यक्तीला राष्ट्र नाहीं, शेतकरी किंवा कामकरी पक्ष हा राष्ट्राच्या मर्यादा जाणीत नाहीं; तो स्थितप्रज्ञाप्रमाणें " भाकरीचा प्रश्न " सोडविण्याकरितां आंतरराष्ट्रीय जागृति करीत राहणार; त्यांचा आध्यात्मिक गुरु मार्क्स ( Karl Marx ) ह्याच्या उपदेशाप्रमाणें, " सर्व जगांतील कामगार हो ! संघटित व्हा ! Proletarians of the world, Unite ! " ही त्याची घोषणा; राष्ट्राचा सर्वस्वीं नाश झाला तरी चालेल; पण कामगार व शेतकरीवर्ग चैन भोगण्याला तयार असला पाहिजे. अशा प्रकारें लष्करी सामर्थ्याच्या जोरावर लढाया करून साम्राज्य मिळविण्याची उठाठेव न करतां, आपल्याच लोकांच्या जिवावर उठून राज्यकारभार करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा आपणांस स्पष्ट दिसून येते.

## लोकसत्तेविषयीं नाझींची विचारसरणी

रशियांतील काम्युनिस्ट पक्षांचें तत्त्वज्ञान मुद्दामच जरा भडक रंगविलें आहे; कारण त्यावरच नाझीपक्षाचें तत्त्वज्ञान उभारलेलें आहे. आतां दुसरें चित्र पहा. लोकसत्तात्मक राज्यपद्धतीमध्यें सत्ता (Sovereignty ) ही मतदारसंघामध्यें असते. मतदारसंघ हा सर्वश्रेष्ठ, त्याच्या हातांत सर्व " कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम् " शक्ति आहे. विधिमंडळांत सभासद नेमण्याचा अधिकार हा सर्वांत श्रेष्ठ अधिकार होय; आणि त्याकरितां मतदारसंघ वाढविण्याकडे सर्व सुधारलेल्या लोकसत्तावादी राष्ट्रांचें लक्ष असतें. वयांत आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांना मताधिकार देऊन मतदारसंघ हा प्रातिनिधिक व शक्य तितका प्रबल करण्यांत आलेला असता.

त्यांनीं निवडलेल्या सभासदांतून बहुमतवाल्या पक्षांतून मुख्य प्रधान व प्रधानमंडळ हीं निवडावयाचीं. अध्यक्ष अथवा त्यांचें मंत्रिमंडळ हीं विधिमंडळाला उत्तरदायी असल्यामुळें व तीं विधिमंडळें मतदारांना उत्तरदायी असल्यामुळें या प्रधान मंडळाच्या हातून लोकमताच्या विरुद्ध कोणतेंही वर्तन अगर निर्बंध अस्तित्वांत येऊं शकत नाहीं. अशा तऱ्हेची शासनपद्धति अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स व स्वित्झर्लंड या देशांत दिसून येते; आणि त्याचीच थोडी हीन तऱ्हेची आवृत्ति हिंदुस्थानांत नव्या १९३५ च्या निर्बंधान्वयें दिसून येत आहे.

लोकसत्तात्मक राज्यपद्धति म्हणजे मतदारसंघाच्या संमतीनें राज्य असें वाटल्यास म्हणावें; पण खरें राज्य श्रीमंत भांडवलशाही साम्राजवादी पक्षाचें राज्य होय. वर्तमानपत्रें हीं Fourth estate of the state " म्हणजेच राष्ट्राची महत्त्वाची संपत्ति होय, ती भांडवलवाल्यांच्या हातांत,



श्रीमंत, कारखानदार, बँका व पेढया यांचे मालक ठरवितील तो मनुष्य विधिमंडळांत बसण्याला लायक अशा तऱ्हेच्या लोकांचा बनलेला पक्ष तो सत्ता चालविणार व त्यांच्या निवडणुकीचा लढा हीं वर्तमानपत्रें चालविणार ! अशा परिस्थितींत मतदारसंघ सुशिक्षित, वयांत आलेला व प्रौढ असला, तरी तो कोणाला मत देणार हें ठरलेलेंच असतें. एका सुविख्यात लेखकानें म्हटल्याप्रमाणें, आपण बहुतेक सर्व दुसऱ्यांच्या उष्टया विचारानें वागतों, यांत शंका नाहीं. वर्तमानपत्रांत छापलेलें पाहिलें, कीं तें आपण सर्वस्वीं खरें मानतों. त्याविरुद्ध बोलणें दूरच, पण विचार करण्यालासुद्धां आपण तयार होत नाहीं. अशा परिस्थितींत चार भांडवलवाले ठरवितील तो *पक्ष यशस्वी व्हावयाचा, व त्यांचें मंत्रिमंडळ व अध्यक्ष अथवा मुख्य प्रधान व्हावयाचा. आणि हें सर्व लोकांच्या पूर्ण संमतीनें चाललेलें आहे, असें सर्वांनीं समजावयाचें ही रीति ! आणि ही लोकसत्तात्मक राज्यपद्धति व प्रजासत्ताक राज्य ! लोकांना व्यवस्थित रीतीनें फसवून, त्यांना मोठेपणा देऊन व पूर्णपणें "बनवून" हा प्रजासत्ताक राज्यकारभार चालविला जातो, आणि सर्वसाधारण मतदारसंघ ह्या सर्वांच्या स्तुतीला भाळून "सर्व सत्ता आपल्या हातांत आहे," अशा मूर्खपणाच्या भ्रमांत रहातो. या भांडवलशाहीच्या वाटेल त्या करवाढीला, परकीय शत्रूंच्या हल्ल्याची खोटी हूल उठवून, लष्कर-आरमार वाढविण्याच्या व दारूगोळा बनविण्याच्या आपल्या कारखान्यांना साहाय्य मिळवून हा पक्ष क्रोडोपति बनतो. अशा रीतीनें राष्ट्रांत वर्गकलह,समाजसत्तावाद आणि भांडवलशाहीची सत्ता वाढवून राष्ट्रीय भावना, नवचैतन्य, राष्ट्राभिमान, संस्कृति, धर्म, व सदाचरण यांचा नाश करण्याला तो प्रवृत्त होत आहे !

* 'We are all second-hand thinkers.' A. G. Gardiner. —Leaves in the wind.

## नाझींचें तत्त्वज्ञान

जनरल गोअरिंगनें आपल्या पक्षाचें तत्त्वज्ञान मोठ्या मार्मिकपणें वर्णिलें आहे.* हर हिटलरचा उजवा हात व प्रशियाचा मुख्य प्रधान म्हणतो कीं, पार्लमेंटरी राज्यपद्धतींत सत्ता सर्वांत खालच्या थरांत असते. पण आमच्याकडे अशी उलटी तऱ्हेवाईक पद्धति नाहीं. सर्व सत्ता एकट्या व्यक्तीच्या हातांत केंद्रीभूत असली पाहिजे आणि हेंच खरें निसर्गाचें तत्त्व आहे.

"All ideas were turned upside down......But the laws of nature demand that authority should be exercised from above downwards, and responsibility from below upwards. Each Leader has authority and he issues his orders to officials, and followers below him. But he is responsible to his superiors only, and the leader at the top is responsible to the people as a whole, and to their future. In the past it has only been by virtue of this principle that any thing has been achieved; only by this principle could nations arise and history be made. But in Germany, Parliament now ruled, the anonymous idea of the majority ruled, the cowardice of mere members was the dominant factor."

नाझीपक्षाचा उदय होण्याला व्हर्सेल्सच्या तहानें उत्पन्न झालेलें निराशामय वातावरण हें जितकें कारणीभूत आहे, तितकेंच जर्मनीची आर्थिक हलाखी, मार्क्सची घसरगुंडी, व्यापाराची पिछेहाट,

* "Germany Rebourn"–General Hermann Goering, Page 37.




अनुक्रमणिका

बेकारीची अमर्याद वाढ व काम्युनिस्टांचें अवसानघातकी वर्तन व अराष्ट्रीय वृत्ति हीं कारणें प्रमुख होत. मनुष्य हा जात्याच आशावादी प्राणी आहे. निराशेच्या भीषण गर्तेंत सुद्धां तो आशावादाचे भव्य मनोरे उठवीत असतो. आणि याच आशावादाच्या सामर्थ्यानें त्याला स्वाभिमानाची व स्वत्वाची जाणीव होऊन त्याच्या उत्कर्षाचा मार्ग दिसूं लागतो. मानवी आशाआकांक्षांचें प्रतिबिंब राष्ट्रांत उत्पन्न होतें व त्याच्या जोरावर राष्ट्रें अभ्युदयाचा निःश्रेयस् गांठीत असतात. नवीन वीमर राज्यघटना १०।१२ वर्षें अस्तित्वांत येऊनही जर्मनीचा अपकर्ष थांबला नाहीं, त्याची वार्षिक खंडणी हप्ता भरण्याचें सामर्थ्य नष्ट झालें, ऱ्हूर प्रांताच्या आक्रमणामुळें "डेवास" पत्रक( Dawes Plan) निर्माण झालें व त्याला आपल्या कबूल केलेल्या अटी ( " Fulfilment " ) पाळाव्या लागल्यामुळें त्याची अत्यंत निकृष्टावस्था झाली.

ह्या सगळ्या हलाखीच्या परिस्थितीला कारण कोण, तर ही " वीमर राज्यघटना " व हें प्रजासत्ताक विधिमंडळ व प्रधानमंडळ ! ह्यांचा उच्छेद केल्याशिवाय जर्मन राष्ट्राचा उत्कर्ष होणार नाहीं, जर्मनीला राष्ट्रांच्या मालिकेंत योग्य तें मानाचें स्थान मिळणार नाहीं, आणि तें आपण मिळवून देऊं अशी घोषणा हर हिटलर व त्याचे नाझी अनुयायी यांनीं केली. याकरितां गेलीं १५ वर्षें त्यांनीं आटोकाट परिश्रम करून आपली उत्कृष्ट संघटना केली. कॉम्युनिस्टांच्या प्रत्येक सभेंत, चळवळींत व मिरवणुकींत भाग घेऊन त्या उध्वस्त करून टाकल्या, त्यांच्याशीं नेहमीं झुंज घेऊन त्यांच्या तत्त्वज्ञानाचा विध्वंस करण्याचें कार्य मोठ्या पद्धतशीरपणें व सामर्थ्याच्या बळावर चालविलें, शेतकरी व कामकरी वर्गावरील कॉम्युनिस्ट व सोशॅलिस्टांची पकड ढिली करून कार्ल मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा व त्याच्या राजक्रांतीच्या घोषणेचा कायमचा निकाल लाविला. अशा रीतीनें राष्ट्रद्रोही समाजसत्तावादी पक्षांचीं पाळेंमुळें खणून काढल्यावर त्यानें प्रजासत्ताक मंडळाचा पिच्छा पुरविण्याचा निश्चय केला.

## मध्यमवर्गाची संघटणा

नाझीपक्षानें कामकरी शेतकरी पक्षाला आपल्या कक्षेंत ओढून श्रीमंत वर्गाला नष्ट करण्याचा प्रयत्न यशस्वी रीतीनें केला. गेल्या महायुद्धांत या भांडवलवाल्यांची संपत्ति उतास जाऊं लागली होती. हे भांडवलवाले म्हणजेच ज्यू लोक होत; त्यांनींच राष्ट्रद्रोह करून जर्मनीच्या शत्रूंना मदत केली, असा त्यांच्यावर आरोप ठेवून त्यांची जर्मनींतून कायमची हकालपट्टी केली. कार्ल मार्क्स हा ज्यू होता हेंही त्यांना कारण पुरलें. प्रख्यात गणिती व शास्त्रज्ञ आइन्स्टीन हा ज्यू आहे एवढ्याकरितां त्याला जर्मनींतून हद्दपार करण्यांत आलें. वर्तमानपत्रें, बँका, मोठे कारखाने व दारूगोळा तयार करण्याचे कारखाने व काम्युनिस्ट चळवळी ज्यू लोकांच्या हातांत आहेत, तेव्हां त्यांचें राष्ट्रांतून उच्चाटण करून जर्मनीची आर्यसंस्कृति अबाधित राखावी अशी घोषणा या नाझीपक्षानें करून एका दगडानें दोन पक्षी ठार मारण्याचें चातुर्य दाखविलें

" The Nasi movement was built upon a mingling of nationalist and economic appeals. The essential thing about Nazism is that it managed to fuse nationalist sentiment and the fear and dislike of Socialism into a combined force too strong to be resisted. The Communists, preaching an internationalist doctrine of revolution, and proclaiming that the workers have no country, outraged the feelings of national resentment at the subjection of Germany."

—G. D. H. Cole



हें प्रो. कोल यांनीं रेखाटलेलें नाझीपक्षाचें चित्र यथातथ्य आहे असें दिसून येईल.

## 'Gleichschaltung' सर्वव्यापी संघटना

ग्लीशर्चेल्टंग या वरील शब्दाचें स्पष्टीकरण करणें झालें, तर त्याला नाझीपक्षाच्या सर्वव्यापि व सर्वत्र दिसून येणारी संघटणा होय असें म्हणावें लागेल. Gleichschaltung हा त्याचा महत्त्वाचा शब्दप्रयोग आहे व येतांजातां त्यावर प्रत्येक ठिकाणीं जोर दिला जातो. सर्व सामाजिक, राजकीय वा आर्थिक संघ आपल्या नाझीपक्षाच्या लोकांनीं व्यापून टाकून आपल्या पक्षाचें तत्त्वज्ञान लोकांत प्रसृत करणें हें त्याचें ध्येय होय. राष्ट्रीय पक्षापासून वेगळा असा कोणताच पंथ, पक्ष अगर संघ, लहान अगर मोठा असो, अस्तित्वांत ठेवावयाचा नाहीं, ही त्यांची महत्त्वाकांक्षा कोणाही राष्ट्रीयपक्षावर म्हणजे हल्लींच्या नाझीपक्षावर जरासुद्धां सौम्य भाषेंत टीका करितां कामा नये, इतक्या भयंकर रीतीनें भाषणस्वातंत्र्य, संघस्वातंत्र्य व लेखनस्वातंत्र्य यांची गळचेपी करणारी आहे.

शेतकरी कामगार पक्षाच्या सभा व त्यांचीं ट्रेडयुनियन्स व इतर नॅशनल सोशॅलिस्ट पक्षाशिवाय सर्व पक्ष नाझींच्या प्रचंड वाफेच्या रुळाखालीं भरडून निघाले आहेत. इटलींतील फॅसिस्ट पक्षाप्रमाणें जर्मनींत नाझी पक्ष हाच राष्ट्रीय पक्ष होय, आणि त्यांत जो नाहीं तो राष्ट्रद्रोही व बंधनापलीकडे गेलेला (Outlaw) स वै मुक्तोऽथवा पशुः। अशी त्याची व्यवस्था करून टाकलेली आहे. आणि हें सर्व नाझीपक्षाच्या "ग्लीशर्चेल्टंग" च्या तत्त्वाप्रमाणें योग्य असल्यामुळें त्याला कोणाचाच विरोध नाहीं.*

* "Gleichschaltung" means in effect that all forms of social organization, both Governmental and non-governmental that are important in the working of German society are to be assimilated to a common type and brought under Leaders animated by a common policy These are to be tolerated within the new state, no organisations, that stand apart from the state, or claim independent rights of criticism and opposition."

—G. D. H. Cole, P. 199,
Modern Politics.

## नाझी पक्षाचें स्वरूप

नाझी पक्षाचा उदय अतिशय आश्चर्यकारक आहे. ही चळवळ प्रथम सन १९१९ त बव्हेरियांत आस्ट्रियांत जन्मलेल्या एका जर्मन तरुणानें सुरू केली. पुढें तिला रशियामध्यें जोर चढला व हां हां म्हणतां ती जर्मनींत पसरली. अडॉल्फ हिटलर हा तो तरुण होय. त्याच्या नेतृत्वाखालीं पुष्कळ कंटाळलेले व निराशेनें ग्रस्त झालेले जर्मन तरुण जमूं लागले. हर हिटलरचे पंचवीस मुद्दे होते, व त्यांची तो प्रत्येक सभेंत घोषणा करीत असे.

पक्षाची संघटणा कशी करावी हें तत्त्व तो इटलीच्या मुसोलिनीपासून शिकला. आपल्या सभा व संस्था यांचें संरक्षण करण्याकरितां त्यानें Storm Troops स्वयंसेवक निर्माण केले, व काम्युनिस्ट व सोशलिस्टांच्या सभा उधळून लावण्याचें शिक्षण त्यांना दिलें. आपल्या निशाणावर "स्वस्तिक" 卐 चिन्हाची खूण कायम केली. गणवेष तपकिरी कपडा (Brown shirts) ठरविला. चळवळीकरितां सर्व जर्मनीचे २६ प्रांत आंखले व प्रत्येक प्रांतांत लहान गट निर्माण करून चळवळे, व्याख्याते व कार्यकारी लोक निर्माण केले. स्वतः हिटलर एक उत्कृष्ट वक्ता असून भावनाप्रधान भाषणें करण्यात प्रवीण आहे.

सन १९२३ मध्यें बर्लिनमध्यें राज्यघटनाभंग करून राज्याधिकार आपल्या ताब्यांत घेण्याचा अयशस्वी प्रयत्न करण्यांत आला होता. त्यांत बरेच लोक गोळीबारांत मरण पावले. स्वतः हिटलर तुरुंगाची हवा खाण्याकरितां निघून गेला. पुन्हा कधींही तो असल्या क्रांतिकारक भानगडींत सत्ता मिळविल्याशिवाय पडला नाहीं.




अनुक्रमणिका

लोकांचा "सोशल डेमॉक्रॅटस्" वरचा हळूहळू विश्वास उडत चालला. वीमर-घटना त्याज्य आहे, जर्मनीच्या उत्कर्ष आम्ही करून दाखवितों, व्हर्सेल्सचा तह नष्ट करून टाकतों, मार्क्स तत्त्वज्ञान व कम्युनिस्ट यांचा नाश करून जर्मनींतील ज्यू, अंतस्थ शत्रूंचें व परकीय लोकांचें ( २ आगस्ट १९१४ नंतर आलेल्यांचें,) उच्चाटण केल्याशिवाय देश स्वतंत्र व्हावयाचा नाहीं, अशी नाझींची घोषणा होती. त्याच्या पक्षावर लोकांचा विश्वास बसल्याचें चिन्ह म्हणजेच मोठ्या प्रमाणावर रिश्टॅगमध्यें ते लोक निवडून येऊं लागले.

सन १९२४ मध्यें रिश्टॅगमध्यें नाझीपक्षाचे ३२ लोक होते; पण पुढील १९२८ च्या निवडणुकींत तें संख्याबल कमी झालें. (१२) नंतर १९३२ मधील निवडणुकींत ही संख्या एकदम २३० पर्यंत वाढली. हिंडेन्बर्गची दुसऱ्यांदा अध्यक्षाच्या गादीवर नेमणूक करण्यांत चान्सेलर ब्रूनिंगची मदत होती. तथापि या चान्सेलरवर लोकांचा विश्वास नाहीं असें दिसून आल्यावर हिंडेन्बर्गनें रिश्टॅग् बरखास्त केलें. हिंडेन्बर्गनें हिटलरशीं अधिकार स्वीकारण्याबद्दल बोलणें सुरू केलें; परंतु "पूर्ण अधिकार व सर्वाधिकारी" नेमीत असाल तर राज्यधुरा घेतों, असा त्यानें जबाब दिला. इतर पक्षांच्या साहाय्यानें कसाबसा कारभार सुरू होता. त्यानंतर व्हॉन पेपन् याला चान्सेलर करण्यांत आलें; प्रधानमंडळाची पुनर्घटना करून त्यानें आपलें मंडळ बनविलें. याही मंडळांत एक प्रधान म्हणून काम करण्याचें हिटलरनें नाकारलें !

हर हिटलरची महत्त्वाकांक्षा मुख्य चान्सेलर होण्याची होती. म्हणून तो प्रत्येक वेळेला असहकार करीत असे. त्यामुळें त्याच्या अनुयायांत फाटाफूट होऊं लागली. स्ट्रासर ( Strasser ) नें शीलरशीं ( Schleicher ) सख्य करून प्रधानमंडळ बनविण्याचें ठरविलें; पण त्याचाही उपयोग झाला नाहीं ! तेंही प्रधानमंडळ मोडलें. हिटलरचा हा विजय होता. त्याच्याशिवाय प्रधानमंडळ कोणीही बनवूं शकणार नाहीं असें जर्मन लोकांना निश्चयानें वाटूं लागलें. एक मंत्रिमंडळ जाऊन दुसरें आलें, कीं नाझीपक्षाचें संख्याबल वाढत असे.

### सर्वाधिकारी हिटलर !

" All power or nothing " ही हर हिटलरची हिंडेनबर्गजवळ मागणी होती. चान्सेलर म्हणून नेमणूक झाल्याबरोबर लगेच रिश्टॅगची निवडणूक करावयाची ही त्याची घोषणा होती; आणि निवडणुकीकरितां आटोकाट प्रयत्न करून इतर सर्व पक्ष जर्मनींत पाळांमुळांसह खणून काढावयाचे असा त्याचा निश्चय होता.

ता. ३० जानेवारी १९३३ रोजीं दुपारीं ११ वाजतां हर अडॉल्फ हिटलरची चान्सेलर म्हणून नेमणूक झाली. सात मिनिटांत त्यानें आपलें मंत्रिमंडळ बनविलें. पूर्वी मंत्रिमंडळ बनविण्याला महिनेच्या महिने लागत असत ! शपथविधि उरकल्याबरोबर वयोवृद्ध फिल्डमार्शल हिंडेन्बर्गनें पुढील शब्दांत आशीर्वाद दिला ' And now, gentlemen, forward with God ! "

त्या दिवसाच्या उत्साही वातावरणाचें व लोकांच्या आनंदसागराच्या भरतीचें वर्णन जनरल गोअरिंगनें केलें आहे. तो म्हणतो,—" त्या दिवशीं ५ वाजतां मंत्रिमंडळाची बैठक होती, त्यांत हर हिटलरचें आपल्या ध्येयाविषयीं भाषण झालें. बर्लिनमधील रस्ते माणसांनीं फुलून गेले होते. शहरोशहरीं व खेड्याखेड्यांत हर हिटलरनें चान्सेलरपद स्वीकारलें, ही बातमी प्रसृत झाल्यामुळें जिकडेतिकडे आनंदीआनंद पसरला होता. लोकांत नवचैतन्याचें व उत्साहाचें वातावरण दिसत होतें व ते गातगात ओरडत मिरवणुकींत सामील होत. रात्रीं हिटलर व हिंडेन्बर्ग यांच्या सन्मानार्थ मशाली ( Torchlight ) घेऊन मोठी मिरवणूक निघाली, कीं अशा तऱ्हेची मिरवणूक बर्लिन शहरांत कधींच निघाली नव्हती !




अनुक्रमणिका

फिल्डमार्शलच्या बंगल्याजवळ ती थांबून व जय-जयकार करून नंतर हिटलरच्या निवासस्थानाशीं थांबली. तेथें स्वस्तिक निशाणाला वंदन होऊन जयघोषांत निघून गेली !"

—"Germany Reborn", P. 116

ता. ५ मार्च १९३३ रोजीं रिश्टॅगची नवीन निवडणूक झाली. नाझीपक्षानें त्या वेळीं इतर पक्षां-विरुद्ध कमालीची चढाईची मोहीम केली. "सोशल डेमोक्रॅटस्" व "काम्युनिस्ट" ह्या पक्षांना प्रचार-कार्यसुद्धां करूं देण्यांत आलें नाहीं. असें असूनही त्यांना ७० लक्ष व ४८ लक्ष अशीं अनुक्रमें मतें पडलीं व नाझीपक्षाला १ कोटी ७० लक्ष पडून ३४१ प्रतिनिधि ( ६४८ पैकीं ) निवडून आले. नाझी व नॅशनलिस्ट एकत्र झाल्यामुळें इतके इतके प्रतिनिधि आले. सोशल डेमोक्रॅटस् ११८ व कॅम्युनिस्ट फक्त ८१ निवडले गेले व बाकीचे इतर पक्षांचे होते.

अशा रीतीनें नाझीपक्षाचें बहुमत झालें. ता. २३ मार्च रोजीं पॉटस्डॅम् ( Potsdam ) येथें नवी रिश्टॅग मंडळाची पहिली व शेवटची सभा झाली. त्यांत ४४४ विरुद्ध ९४ मतांनीं " सर्वाधिकार " ( Enabling act ) हिटलरला चार वर्षांपुरते देण्याचे ( एप्रिल १९३७ ) ठरलें. ही मुदत नुक्तीच संपली आहे.

हर हिटलर सत्ताधारी बनल्यावर प्रथम त्यानें इतर पक्षांचा पद्धतशीरपणें नाश करण्याचा प्रयत्न केला. कॉम्युनिस्टांना कोणतेही हक्क वर्ज केले ( Oultaw ) व त्यांच्या पक्षाच्या कचेरींत नाझी पोलिस दळाची स्थापना केली ! रिश्टॅगमधील त्यांच्या सभासदांची व सोशल डेमोक्रॅटस् सभासदांची हकालपट्टी करण्यांत आली. त्यांचे कागदपत्र, पैसा व स्थावर मिळकत जप्त करून " राष्ट्राच्या हिताविरुद्ध त्यांची चळवळ आहे " असा आरोप ठेविला. एकामागून एक सर्व राष्ट्रद्रोही ठरविण्यांत येऊन त्यांची धरपकड करून तुरुंगांत डांबलें अगर हद्दपार केलें.

ता. १४ जुलईला नाझी पक्ष हाच एकमेव राष्ट्रीय पक्ष असून इतर कोणताही पक्ष कोणीं काढतां कामा नये असा निर्बंध झाला. " The national Socialist German Workers' Party is the only political party in Germany. The decree further imposed heavy penalties upon any one undertaking to maintain the organization of another political party or to form a new political party."

—The Hitler Decrees, P. 34, by J. K. Pollock, & H. J. Heneman.

ता. ६ जुलई १९३३ ला रिश्टॅगमधील सभासदां-पुढें भाषण करतांना हर हिटलरनें पुढील तऱ्हेचें बढाईखोर भाषण करून सर्व पक्षांचा नायटाट केल्या-मुळें आपल्या डोळ्यांचें पारणें फिटलें असें घोषित केलें. " The political parties have now been finally abolished. This is an historical event of which the importance and far-reaching effects have in many cases not yet been realized by all. We must now get rid of the last remains of democracy, especially of the methods of voting and of the decisions by majority. The National Socialist party has now become the state ! "

आणि तें खरें आहे. नाव्हेंबर १९३३ मधील निवडणुकींत नाझीपक्षाला शें. ९३.५ मतें पडलीं ! ६३९ नाझी ब्राउनशर्टर्स प्रतिनिधि रिश्टॅगमध्यें



जमून ७॥ मिनिटांत नव्या ठरावानें हिटलरला संपूर्ण अधिकार दिल्याचें पुनश्च घोषित केलें !

## नाझी जर्मनीचें भवितव्य

गेल्या ५ वर्षांत जर्मनीमध्यें वीमर राज्यघटना नष्ट झाल्यापासून नाझींचें राज्य चालू आहे. सर्व सत्ता केंद्रीभूत झालेली आहे. प्रतिनिधिक संस्थांना मत-स्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य व कृतिस्वातंत्र्य नाहीं, राष्ट्रीय प्रगति व देशभक्ति यांना पुनश्च संपूर्ण वाव मिळाला आहे, आर्थिक स्थिति सुधारली आहे, लष्कर, आरमार व वैमानिक दळ वाढत आहे, सार प्रांतावर वर्चस्व बसविण्यांत आलें आहे, आंतरराष्ट्रीय जगांत जर्मनीची योग्यता निश्चितपणें वाढली आहे, इटली व जर्मनी यांची मैत्री झाल्या-कारणानें त्यांच्या वाटेला तूर्त कोणी जाणार नाहीं. पोलंडशीं दहा वर्षांच्या शांततेचा तह करून हिटलरनें आपल्या सरहद्दीवर स्नेही निर्माण केला आहे.

शेतकरी-कामकरी लोकांच्या तक्रारी दूर झाल्या आहेत. व्यापार वाढला, बेकारी कमी झाली, कॅथालिक चर्च व ज्यू बँका व त्यांचें आर्थिक धोरण, आणि मोठे धंदे यांकडे हर हिटलरचें लक्ष जाऊनही उपयोग झाला नाहीं. आजच लढाईच्या खाईंत उडी घेण्याची जर्मनीची तयारी नाहीं, त्याला निदान आणखी दहा वर्षांचा काळ जावा लागेल.

इटलींतील फॅसिस्ट पक्षाच्या भवितव्याप्रमाणें नाझी जर्मनीचें भवितव्य विशाल कालाच्या तराजूंत हेलखावे खात आहे. सर्वाधिकाऱ्यांचें आसन युरोपांतील ह्या प्रमुख राष्ट्रांत किती वेळ राहूं शकेल याचें नक्की अनुमान कोणी करूं शकणार नाहीं. परंतु एक गोष्ट निश्चित आहे कीं, जोंपर्यंत हे सर्वाधिकारी राष्ट्रांत देशाभिमानाची ज्योत पेटवून देशहित साधण्याची तत्परता राखीत आहेत, तोंपर्यंत त्यांचें आसन अढळ राहूं शकेल.

१९३४ च्या उन्हाळ्यांत "स्टॉर्म ट्रूपस्" चा उपसर्ग वाढूं लागला म्हणून हर हिटलर व जनरल गोअरिंग यांनीं त्यांच्या पुढाऱ्यांना पकडून गोळ्या घालून ठार केलें. त्यांनीं कट करून राष्ट्रद्रोह केला असा आरोप त्यापूर्वी त्यांच्यावर शाबीत करण्यास ते चुकले नाहींत ! रशियामध्यें सुद्धां पुष्कळ गुप्त कट व गुन्हेगार गुन्ह्यांच्या कबुल्या देतात, हें आपण ऐकिलें आहेच. आणि मग त्यांना फांशी देण्यात येतें.

जगामध्यें ज्या ज्या ठिकाणीं जर्मन मनुष्य आहे, त्या त्या ठिकाणीं जर्मन राष्ट्राच्या देशाभिमानाची व स्वाभिमानाची ज्योत पेटत ठेवून नाझीपक्षाचें सर्वाधिकारित्व कायम ठेवणें हें आपलें ध्येय हर हिटलर बजावून सांगत आहे. पाहूं या तें कितपत साध्य होतें तें. विशाल कालच याचा योग्य निर्णय करूं शकेल.

**Bibliography**

(i) The Evolulion of modern Germany.—W. H. Dawson.

(ii) The Crisis of German Democracy — H. Kraus, 1933.

(iii) History of national Socialism—K. Heiden. 1934.

(iv) New Democratic constitutions of Europe—A. Headlam-Morley.

(v) European Governments & Politics—Prof. F. A. Ogg

**बा. रा. मावळंकर**

---






अनुक्रमणिका

# परीक्षण

## सांजवात

**ले. रा. बाळ रानडे. प्र. डॉ. भा. गो. रानडे. सुलतानबझार, हैद्राबाद ( दक्षिण ). १९३७, ७"×५", पृ. ४४. किं. ०-८-०.**

अलीकडे लघुकथांच्या मानानें लघुगीतांची निष्पत्ति कमी प्रमाणावर होऊं लागली आहे, हें मराठी वाङ्मयाच्या काव्यशाखेकडे वरवर पाहणाऱ्याही सहज लक्षांत येणारें आहे. या परिस्थितीनें निराशून जाण्याचें कारण नाहीं. आतांपावेतों जी कांहीं कवितांची निपज झाली, ती जरा भरमसाटपणेंच झाली या समजुतीनें कित्येकांकडून जरी तिची उपेक्षा वा हेटाळणी करण्यांत आली, तरी ती निपज वाङ्मयाच्या पचनीं पडण्याला ज्या कालावधीची जरूरी आहे, ती सांप्रतची वेळ आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं; तथापि निष्पत्तीच्या दृष्टीनें पडत्या ठरणाऱ्या चालू काळांतही जे थोडेसे स्फुट कवितांचे संग्रह प्रसिद्ध होऊन ज्यांनीं मराठी काव्यक्षेत्राची थोडीबहुत बूज राखली किंबहुना ज्यांच्या हातून ती राखली जाईल, अशी आशा वाटते, त्यांमध्यें कवि नीलकंठ ऊर्फ बाळ रानडे यांच्या 'सांजवात' नामक प्रकृत संग्रहाचा उल्लेख केला पाहिजे. पुस्तकांत एकंदर ४२ कविता असून तीं सगळीं भावगीतें होत, निरनिराळ्या वृत्तींना अनुसरून त्यांतील विषयांची मांडणी झाली आहे. पुस्तकाला 'गिरीश' कवींनीं पुरस्कार जोडला असून तो उद्बोधक आहे. कवितांतील निरनिराळ्या भावांचे धागे स्नेहाळूपणें उलगडून देण्याच्या कामीं वरील पुरस्काराचा चांगला उपयोग होतो.

पुस्तकाला दिलेलें व प्रस्तावनाकारांनीं गौरविलेलें 'सांजवात' हें नांव काव्याभिरुचीला गोड लागते हें खरें; पण त्या नांवांत प्रकृत ठिकाणीं काव्याभिनिवेशदृष्टीनें औचित्य नाहीं. सांजवात ही दिवसा दमल्याभागलेल्यांना उत्साहक व उल्हासप्रद भासते; पण दिवसभर सृष्टीचीं नानाविध रम्य रूपांतरें अनुभवणाऱ्या बालकाला ती सांजवात विश्रांतीची सूचक होते. बाळ रानडे यांचा हा संग्रह बाल्यांतून यौवनांत पदक्षेप करणाऱ्या नवतरुणाला साजेसा आहे. दिवसाला कंटाळून गेलेली त्यांची वृत्ति नाहीं. म्हणून 'वासंतिक उषे'नें त्यांच्या ठायीं जितकी प्रसन्नता व विलीनता उत्पन्न होते, तितकी 'सांजवाते'नें झालेली दिसत नाहीं; उलट ती कविता कर्त्याच्या ज्या अवास्तव उद्धतवृत्तीची द्योतक होते, ती वृत्तिच प्रकृत कृतींत कोठें अन्यत्र अनुभवास येत नाहीं.

कोणीही कवि नवीनच सृष्टीकडे पाहूं लागला, म्हणजे तो औत्सुक्य व आनंद या बालसुलभ वृत्तीनेंच तिचें ग्रहण करूं शकतो. ही वृत्ति बाळ रानडे यांच्या बाबतींत दिसून येते. कुंजांतून वासंतिक उषेचें लपतछपत येणें, इंदुदर्शनासरशीं सागराचें उचंबळणें, कोंदणांत चमकणाऱ्या हिरकणीप्रमाणें क्षितिजावर विमल चांदणीचें दर्शन घडणें, छायाप्रकाशांतून निर्झराचें अल्लडपणें धांवणें, त्याचप्रमाणें उषेचें स्वागत करणारीं पाखरें, दर्या फेंसाळून सोडणारा वादळवारा, भावगीतिका फुलविणाऱ्या प्रेमाच्या कुंदकळ्या, भावजलानें पालवणारी काव्याची





अनुक्रमणिका

ळवेल इत्यादिक दृश्यें कुतूहलतेनें पाहत त्यांच्याशीं मरसता पावणें हें बालभावसुलभतेचें चिन्ह नाहीं सें कोण म्हणेल ? प्रकृत संग्रहांतील बहुतेक गीतांतून रील दृश्यें कवीनें रंगविलीं आहेत. - त्यांत कवीची ौहार्द्रता व सौंदर्याभिरुचि चांगलीं अनुभवास तात; वरील गुणांबरोबर तारुण्यांतील आशा, ाकांक्षा व सहानुभूति या भावनांचाही वाचकाला रिचय होतो. जागतिक शांतता मिळविण्यासाठीं ;वीला ज्याप्रमाणें वेडें व्हावेंसें वाटतें, त्याचप्रमाणें ातांत नवशक्तीचें खड्ग घेऊन काळाशीं झुंज कर- याऱ्याही तो तयारींत राहतो. आकांक्षातृप्तीसाठीं गांतले कडू गोड धडे घेण्याची जशी तो उमेद ाळगतो, तसे आजकालच्या पोरासोरांतूनच उद्यांचे ाष्ट्रमोहरे निर्माण होतील, असें आश्वासून सांगतो, गांत चांगल्याचें चीज होत नाहीं व गरीब शेतक- यांच्या कष्टमय जीवनाची खरी कल्पना पुष्कळांना ासते; या वस्तुस्थितीचें वर्णन कवीनें सहृदयतेनें ेलें आहे. अशा प्रकारें निरनिराळ्या प्रसंगीं उत्पन्न ालेल्या भिन्नभिन्न वृत्तींचे जें चित्रण प्रकृत स्थळीं ाहावयास मिळतें, त्यावरून कवीची वर्णनशैली व विषयाशीं झालेली समरसता यांचा चांगला प्रत्यय येतो.

रचनेच्या दृष्टीनें बहुतेक कविता निर्दोष आहेत. अमृत शब्द चार मात्रांचा कल्पणें, मंदिरांतील 'दि'ला दीर्घत्व देणें, यासारखे किरकोळ दोष येथें दिसतात. सुनीतरचना तोटक्या वृत्तांत केल्यानें तिच्या धीरोदात्त वृत्तीचा लोप करणें, तसेंच त्या रचनेमध्यें आवश्यक असणाऱ्या शेवटच्या विपर्या- साला फांटा देणें हींही दोषस्थळेंच होत. पूर्वीच्या मानानें अलीकडची काव्यरचना पुष्कळ अंशीं शुद्ध स्वरूपांत होऊं लागली आहे, ही अभिनंदनीय गोष्ट आहे. तथापि ती पूर्ण निर्दोष असावी अशी कोणाची कां अपेक्षा असूं नये ? बाळ रानडे यांनीं घेतलेल्या चाली सर्वपरिचित असल्यानें सामान्य वाचकांनाही त्या प्रिय होणाऱ्या आहेत.

पुस्तकाची छपाई व बांधणी सुबक असून मल- पृष्ठावरील चित्रही आकर्षक आहे.

भोर, गणेशपेठ. **ना. म. भिडे**

---



१०९७. कारण, सूर्य जसा आपल्या तेजानें पृथ्वीचें आक्रमण करतो, तसा भगवान् कामोपभोगांवर जय मिळवून राहत आहे. हे विपुलप्रज्ञा, मर्यादित प्रज्ञा ज्याची अशाला मला मी जाणूं शकेन अशा रीतीनें जन्म आणि जरा यांचा नाश करणारा धर्म सांग. (२)

१०९८. निर्वाणपद क्षेमकर असें जाणून, हे जतुकण्णी, असें भगवान् म्हणाला,-कामोपभोगांचा लोभ सोड, व आसक्ति आणि अनासक्ति यांपैकीं कांहींही शिल्लक ठेवूं नकोस. (३)

१०९९. जें पूर्वकालीन तें शोषित कर, आणि भविष्यकाळीं कांहीं राहूं देऊं नकोस, व वर्तमानकाळाला जर तूं पकडून बसणार नाहींस, तर उपशांत होऊन राहशील. (४)

११००. हे ब्राह्मणा, नामरूपाविषयीं सर्वथा वीतलोभ झालेल्या माणसाला, ज्यांहींकरून तो मृत्यूला वश होईल, असे आश्रव राहत नाहींत. (५)

---

## ६७. भद्रावुधमाणवपुच्छा (१२)

११०१. गृहत्यागी, तृष्णेचा उच्छेद करणारा, अप्रकंप्य-असें आयुष्मान् भद्रावुध म्हणाला,-आसक्तीचा त्याग करणारा, ओघतीर्ण, विमुक्त, विकल्पत्यागी व सुमेघ अशा तुजपाशीं मी (धर्मोपदेशाची) याचन करतों. नागाचा तुझा उपदेश ऐकून येथून हे जन संतुष्ट होऊन जातील. (१)

११०२. हे वीरा, तुझें भाषण ऐकण्याच्या इच्छेनें हे जन अनेक देशांतून येथें जमा झाले आहेत. त्यांना तुझा धर्म नीट समजावून सांग. कां कीं, हा धर्म तुला चांगला समजतो. (२)

११०३. सर्व प्रकारची आदानतृष्णा-हे भद्रावुधा, असें भगवान् म्हणाला,-मग ती वर, खालीं, चौफेर किंवा मध्यें असो, तिचा नाश करावा. कारण जगांत ज्या ज्या वस्तूचें प्राणी उपादान करतो, तिच्या तिच्याद्वारें मार त्याच्या मागें लागतो. (३)

११०४. म्हणून, हे लोक आदानांत आसक्त झालेले आणि मृत्युध्येयाला चिकटलेले पाहून जाणत्या भिक्षूनें स्मृतिमान् होऊन सर्व जगांत कोणत्याही प्रकारचें उपादान करूं नये. (४)

---

## ६८. उदयमाणवपुच्छा (१३)

११०५. ध्यानरत, विमल, स्थिर, असें आयुष्मान् उदय म्हणाला,—कृतकृत्य, अनाश्रव, आणि जो सर्व धर्मांत पारंगत, त्याजपाशीं मी प्रश्न विचारण्याच्या इच्छेनें आलों आहें. अविद्येचा भेद करणारा व प्रज्ञेनें मिळणारा विमोक्ष कोणता तें सांग. (१)

११०६. कामच्छंद आणि दौर्मनस्य,—हे उदया, असें भगवान् म्हणाला—या उभयतांचा त्याग करणारा, आळसाचा नाश करणारा, कुशंकांचें निवारण करणारा, २

११०७. उपेक्षेनें आणि स्मृतीनें शुद्ध झालेला, आणि ज्याच्या आरंभीं धार्मिक वितर्क जोरदार असतो, तो अविद्येचा भेद करणारा व प्रज्ञेनें मिळविलेला विमोक्ष, असें मी म्हणतों. (३)

११०८. जगाचें संयोजन कोणतें? त्याला चिंता कोणती? आणि कशाच्या नाशानें त्याला निर्वाण मिळतें? (४)

११०९. लोभ जगाचें संयोजन होय; वितर्क ही त्याची चिंता; आणि तृष्णेच्या नाशानें त्याला (जगाला) निर्वाण मिळतें. (५)

१११०. कशा रीतीनें वागल्यानें माणसाच्या विज्ञानाचा विरोध होतो, हें भगवंताला आम्ही विचारतों, त्यावर तुझें उत्तर कोणतें तें आम्ही ऐकूं इच्छितों. (६)

११११. आध्यात्मिक आणि बाह्य वेदनेचें जो अभिनंदन न करतां वागतो, त्याचें विज्ञान निरोध पावतें. (७)

---

## ६९. पोसालमाणवपुच्छा (१४)

१११२. जो पूर्वजन्म सांगूं शकतो-असें आयुष्मान् पोसाल म्हणाला-जो अप्रकंप्य, ज्याचे संशय नष्ट झाले, व जो सर्व धर्मांत पारंगत, त्याजपाशीं मी प्रश्न विचारण्याच्या इच्छेनें आलों आहें. (१)

१११३. ज्यानें रूपसंज्ञांचा अतिक्रम केला व देहबुद्धि सोडली आणि जो अभ्यंतरीं किंवा बाह्य कोणतीही वस्तु नाहीं असें पाहतो, त्याला ज्ञान कोणतें मिळतें व तो कोणत्या मार्गानें जातो हें, शाक्या, मी तुला विचारतों. (२)

१११४. विज्ञानाच्या सर्व पायऱ्या जाणणारा, हे पोसाला, असें भगवान् म्हणाला,-तथागत, असा माणूस



कोणत्या पायरीवर असून व तत्परायण होऊन विमुक्त झाला आहे हें जाणतो. ( ३ )

१११५. त्या पायरीवर असलेल्या माणसानें आपला जन्म आकिंचन्यलोकीं होण्याचा संभव आहे आणि ती वासना संयोजनकारक आहे, असें जाणून तिची अनित्यादिक लक्षणांच्या योगें भावना ( विपस्सना ) करावी. त्या कृतकृत्य ब्राह्मणाला हें यथार्थ ज्ञान मिळतें. ( ४ )

---

## ७०. मोघराजमाणवपुच्छा ( १५ )

१११६. मी शाक्याला ( बुद्धाला ) दोनदां प्रश्न विचारला—असें आयुष्मान् मोघराजा म्हणाला,—पण त्या चक्षुष्मन्तानें मला उत्तर दिलें नाहीं; तिसऱ्यानदां प्रश्न विचारला असतां तो देवर्षि उत्तर देत असतो असें मी ऐकलें आहे. ( १ )

१११७. हा लोक, परलोक, आणि सदेवक ब्रह्मलोक यशस्वी गोतमाची तुझी दृष्टि कशा प्रकारची हें जाणत नाहीं. ( २ )

१११८. अशा प्रकारें उच्च दर्जाची ज्याची दृष्टि त्याजपाशीं मी प्रश्न विचारण्याच्या इच्छेनें आलों आहें. जगाकडे कोणत्या रीतीनें पाहिलें असतां त्या माणसाकडे मृत्युराजा पाहत नसतो ? ( ३ )

१११९. हे मोघराजा, सदोदित स्मृतिमान् होऊन जग शून्य आहे हें अवलोकन कर, आणि आत्मदृष्टि सोडून दे, व येणेंकरून मृत्यूच्या पलीकडे जाणारा हो. अशा रीतीनें जो जगाकडे पाहतो त्याजकडे मृत्युराजा पाहत नसतो. ( ४ )

---

## ७१ पिंगियमाणवपुच्छा ( १६ )

११२०. 'मी जीर्ण, अबल आणि वीतवर्ण आहें'— असें आयुष्मान् पिंगिय म्हणाला,—'माझे डोळे साफ नाहींत, कानांना ऐकण्यास कठीण पडतें.' तेव्हां मोहबद्ध होऊन एकाएकीं माझा अंत न व्हावा, म्हणून मला समजेल अशा रीतीनें जन्मजरेचा नाश करणारा धर्म मला सांग. ( १ )

११२१. रूपांत लोक प्रमत्त होऊन—हे पिंगिया, असें भगवान् म्हणाला,— दुःख भोगतात व आघात पावतात हें पाहून, हे पिंगिया, पुनर्जन्म न व्हावा एतदर्थ अप्रमत्त होऊन तूं रूपाचा त्याग कर. ( २ )

११२२. ( हे भगवन्, ) चार दिशा, चार विदिशा, वर आणि खालीं या दाही दिशांत अदृष्ट, अश्रुत, अननुमित आणि अविज्ञात असें या जगांत तुला कांहीं नाहीं; म्हणून मला समजेल अशा रीतीनें जन्मजरेचा नाश करणारा धर्म कोणता, तें सांग. ( ३ )

११२३. तृष्णेंत बद्ध झालेल्या, हे पिंगिया, असें भगवान् म्हणाला,—आणि त्यामुळें संताप पावणाऱ्या व जरेनें ग्रस्त अशा माणसांना पहा; आणि म्हणून हे पिंगिया, पुनर्जन्म न व्हावा एतदर्थ अप्रमत्त होऊन तूं तृष्णेचा त्याग कर. ( ४ )

---

## ७२. पारायणसुत्त

मगध देशांत पाराणक चेतिय येथें राहत असतां भगवान् असें बोलता झाला. बावरीच्या सोळा ब्राह्मण शिष्यांनीं आपल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास विनंती केली, तेव्हां भगवंतानें त्यांच्या प्रश्नांचीं यथायोग्य उत्तरें दिलीं, यांपैकीं एखाद्या उत्तराचाही अर्थ जाणून जो तदनुसार वागेल, तो जरामरणाच्या पार जाईल. हा उपदेश संसाराच्या पार नेणारा म्हणून याचें पारायण हें नांव.

११२४. अजित, तिस्स मेत्तेय्य, पुण्णक, मेत्तगू, धोतक, उपसीव, नंद आणि हेमक, ( १ )

११२५. तोदेय्य आणि कप्प हे दोघे, आणि पंडित जातुकण्णि, भद्रावुध, उदय आणि ब्राह्मण पोसाल, मेधावी मोघराजा आणि महर्षि पिंगिय, ( २ )

११२६. हे सदाचारसंपन्न ऋषीपाशीं-बुद्धापाशीं—आले, आणि त्यांनीं त्या बुद्धश्रेष्ठाला मार्मिक प्रश्न विचारले. (३)

११२७. बुद्धानें त्यांच्या प्रश्नांचीं यथायोग्य उत्तरें दिलीं. त्या मुनीनें योग्य उत्तरें देऊन त्या ब्राह्मणांना संतुष्ट केलें. (४)

११२८. आदित्यबंधु बुद्धानें संतुष्ट केलेले ते ब्राह्मण त्या श्रेष्ठ प्रज्ञापाशीं ब्रह्मचर्य आचरते झाले. ( ५ )

११२९. बुद्धानें दिलेल्या उत्तरांपैकीं एका उत्तरालाही अनुसरून जो चालेल, तो संसाराच्या पार जाईल. ( ६ )

११३०. त्या उत्तम मार्गाची भावना करून तो संसाराच्या पार जाईल. तो मार्ग पार जाण्यासाठीं, म्हणून त्याला पारायण म्हणतात. ( ७ )

११३१. पारायणाचें मी अनुगान करतों—असें आयुष्मान् पिंगिय म्हणाला,--विपुलप्रज्ञानें ( बुद्धानें ) जसा




अनुक्रमणिका

हा मार्ग जाणला, तसा उपदेशिला. तो निष्काम आणि निस्तृष्ण नाथ कोणत्या उद्देशानें खोटें बोलेल ? ( ८ )

११३२. ज्याचे मल आणि मोह नष्ट झाले आहेत आणि ज्यानें अहंकाराचा व अनादरबुद्धीचा त्याग केला आहे, त्याच्या सुंदर वाणीचें मी वर्णन करीत राहीन. (९)

११३३. तमाचा नाश करणारा, समन्तचक्षु, संसारपारग, सर्व भवांच्या पलीकडे गेलेला, अनाश्रव आणि सर्व दुःखांपासून मुक्त असा हा बुद्ध आहे. हे ब्राह्मणा, त्या नांवाप्रमाणें वर्तणाऱ्या बुद्धाची मीं उपासना केली. ( १० )

११३४. ओसाड जंगल सोडून पक्षी जसा फलसंपन्न वनांत जातो, किंवा हंस जसा मोठ्या सरोवराला जातो, त्याप्रमाणें अल्पप्रज्ञांना सोडून मी येथें ( गोतमापाशीं ) आलों. ( ११ )

११३५. गोतमाच्या उपदेशापूर्वी मला जे सांगत कीं, हें असें आहे, आणि हें असें होईल, तें सर्व केवळ परंपरागत आलेलें आणि तर्क वाढवणारें होतें. ( १२ )

११३६. पण हा विपुलप्रज्ञ गोतम, हा विपुलबुद्धि गोतम तेवढाच एक तमाचा नाश करणारा व खरा प्रकाश पाडणारा मला आढळला. ( १३ )

११३७. ज्यानें मला सम्यक् दृष्टि ज्यांत आहे असा, अकालफलद, तृष्णेचा नाश करणारा, निर्दुःख व अनुपम धर्म उपदेशिला. ( १४ )

११३८. हे पिंगिया, त्या विपुलप्रज्ञ गोतमापासून, त्या विपुलबुद्धि गोतमापासून तूं मुहूर्तभरही दूर कसा राहशील ? ( १५ )

११३९. ज्यानें तुला सम्यक्दृष्टि ज्यांत आहे असा, अकालफलद, तृष्णेचा नाश करणारा, निर्दुःख व अनुपम धर्म उपदेशिला. ( त्यापासून तूं कसा दूर राहशील ? ) ( १६ )

११४०. हे ब्राह्मण, त्या विपुलप्रज्ञ गोतमापासून, त्या विपुलबुद्धि गोतमापासून मी मुहूर्तभरही दूर राहणार नाहीं. ( १७ )

११४१. ज्यानें मला सम्यक्दृष्टि ज्यांत आहे असा, अकालफलद, तृष्णेचा नाश करणारा, निर्दुःख व अनुपम धर्म उपदेशिला ( त्यापासून मी दूर राहणार नाहीं ). ( १८ )

११४२. हे ब्राह्मणा, त्याला मी रात्रंदिवस अप्रमत्त होऊन मनानें किंवा डोळ्यांनीं पाहतों, त्याला नमस्कार करून मी रात्र घालवतों, आणि त्यायोगें मी त्याच्या सहवासांत आहें असें समजतों. ( १९ )

११४३. माझी श्रद्धा, प्रीति, मन आणि स्मृति गोतमाच्या उपदेशापासून अलग होत नाहींत. ज्या ज्या दिशेला तो विपुलप्रज्ञ जातो, त्या त्या दिशेनें मी नत होतों. ( २० )

११४४. मी वृद्ध आणि बलहीन झाल्याकारणानें माझा काय त्या दिशेला जाऊं शकत नाहीं. पण माझी संकल्पयात्रा तेथें नित्य होते. कां कीं, हे ब्राह्मणा, माझें मन तेथें जडलें आहे. ( २१ )

११४५. मी चिखलांत पडून तडफडत होतों व एका द्वीपापासून दुसऱ्या द्वीपाला वाहून जात होतों. इतक्यांत ओघतीर्ण अनाश्रव संबुद्धाला मीं पाहिलें. (२२)

११४६. वक्कलि, भद्रावुध आणि आळविगोत्तम हे जसे मोठे श्रद्धावान् झाले, तसा, हे पिंगिया, तूंही श्रद्धावान् हो. येणेंकरून तूं मृत्युध्येयाच्या पार जाशील. (२३)

११४७. हें मुनीचें वचन ऐकून माझें मन आणखीही प्रसन्न झालें. अविद्येचें आवरण दूर सारणारा, काठिन्यरहित आणि प्रतिभाशाली संबुद्ध, (२४)

११४८. अधिदेवांना आणि सर्व उच्चनीच भावांना जाणतो, आणि आपणास संशयग्रस्त म्हणविणाऱ्या माणसांच्या प्रश्नांचा ( योग्य उत्तरें देऊन ) निकाल लावणारा तो शास्ता (गुरु) आहे. ( २५ )

११४९. अहार्य, असंकोप्य आणि अनुपम अशा निर्वाणाला मी खात्रीनें जाईन, त्यांत मला शंका नाहीं. अशा रीतीनें मी श्रद्धाविमुक्त आहें असें समज. ( २६ )

**धर्मानंद कोसंबी,** ( भाषांतरकार )

---






अनुक्रमणिका

# पुस्तक-परीक्षण

( अद्वैतवेदान्त—प्राथमिक अभ्यास )

[ लेखकः—श्री. भास्कर सावळाराम नाईक;
किंमत १ रुपया ]

अद्वैतवेदान्त या छोट्या वेदान्ततत्त्वविषयक ग्रंथाचे लेखक श्री. नाईक हे अमळनेरच्या तत्त्वज्ञान-मंदिर या नियतकालिकाच्या वाचकांस तत्त्वज्ञानाचे अभ्यासु म्हणून चांगलेच परिचित आहेत. त्या नियतकालिकांतील अद्वैतविषयक कित्येक लेख व श्री. ज्ञानेश्वरदर्शन या विशिष्ट ग्रंथासाठीं हेतुपुरस्सर लिहिलेला लेख इतर कांहीं विचारांची भर घालून या पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. अद्वैततत्त्वज्ञान सर्व तत्त्वज्ञानांत श्रेष्ठ आहे, ही गोष्ट मान्य करावयास द्वैतवादी तत्त्वज्ञ सिद्ध नाहींत हें सुप्रसिद्धच आहे; पण एका विशिष्ट दृष्टीनें विचार केल्यास अद्वैततत्त्वज्ञानाची थोरवी सहज कळून येते. द्वैत हें सर्वांना प्रथमदर्शनीं दिसतेंच आहे, त्याला तत्त्वज्ञान म्हणण्याची व तें सिद्ध करून द्यावयाचा खटाटोप करीत बसण्याची आवश्यकताच कोठें आहे? अज्ञान बालकही द्वैत सहज जाणतो आणि 'ही माझी आई, तुझी नव्हे,' असें इतर भावंडांना सांगत सुटतो. पण जसें जसें त्याचें वय वाढून अंगीं समंजसपणा येऊं लागतो, तसतशी त्याची द्वैतबुद्धि जात जाऊन ऐक्यभावना तिची जागा पटकावूं लागते. द्वैत मान्य करणें हें इतकें सोपें आहे कीं, त्याविषयीं बुद्धीला शीण देण्याचें कारणच नाहीं. अद्वैत आणि स्वातंत्र्य यांची जोडी आहे. पारतंत्र्याचा विचार सोपा आहे व आचार त्याहूनही सोपा आहे. पण स्वातंत्र्याचा विचार अत्यंत कठिण असून त्याचा आचार त्याहूनही कठिणतर आहे. अद्वैताचेंही तसेंच आहे. म्हणून लोकव्यवहारांत जसें स्वातंत्र्य श्रेष्ठ, तसें तत्त्वज्ञानांत अद्वैत श्रेष्ठ होय. किंबहुना असेंही म्हणावयास अडचण नसावी कीं, अद्वैत आणि स्वातंत्र्य हीं एकच होत. द्वैताची म्हणजेच पराची भावना संपली कीं अद्वैताची अर्थात् स्वातंत्र्याची सिद्धि होते.

अशा या अद्वैताची सिद्धि कशी होते, हें शक्य तितक्या तर्कसिद्ध कोटिक्रमानें दाखवून देणें हें प्रस्तुत काळीं अवश्य आहे. केवळ शाब्दप्रामाण्यानें त्याची सिद्धि करणें सोपें आहे. पण ही सिद्धि बहुतांशीं श्रद्धेच्या बळावरच होणारी असल्यामुळें श्रद्धेच्या अभावीं कोटिक्रमावर अधिक भार टाकणें प्रस्तुत युगांत अवश्य झालें असून तसे प्रयत्न आधुनिक विद्वानां-कडून होत आहेत, ही समाधानाची गोष्ट होय. श्री. नाईक यांचा प्रयत्न अशाच स्वरूपाचा असून, त्यांत कोटिक्रमाचीच कास बहुतांशीं धरलेली दिसून येते.

औपनिषद् शास्त्रांत म्हणजे वेदांतदर्शनांत जशीं द्वैत व अद्वैत अशीं दोन मुख्य मतें आहेत, तशीं अद्वैतांतही पुनः केवलाद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत अशीं पोटमतें आहेत. पण त्यांत केवलाद्वैत हेंच वास्त-विक अद्वैत मत असून इतर द्वैताचींच भावंडें होत. केवलाद्वैतांतही पुनः कांहीं पोटमतें आहेत. पाश्चात्य तत्त्वज्ञानांतून निघालेलें जडाद्वैत आणि भारतीय तत्त्व-



ज्ञानाचा ज्याला कळस म्हणतां येईल तें चिदद्वैत. श्री. नाईक हे भारतीय तत्त्वज्ञानाचे अभ्यासु असल्या-मुळें त्यांच्या प्रस्तुत निबंधाचा विषय अर्थातच चिदद्वैत हाच आहे. या चिदद्वैतांतही आणखी बारीक पक्ष आहेत, त्यांना मायावाद आणि अजातवाद असें म्हणण्याचा प्रघात आहे. विवेचनपद्धतीच्या दृष्टीनें हे दोन वाद थोडेसे भिन्न दिसत असले, तरी त्यांचें अंतिम सूत्र एकच आहे. मायावादाचे पुरस्कर्ते आद्य श्रीमच्छंकराचार्य आणि अजातवादाचे पुरस्कर्ते मराठी संतकवि श्रीज्ञानेश्वर हे होत.

श्री. नाईक यांच्या प्रस्तुत निबंधांत मायावाद आणि अजातवाद यांचा समन्वय करण्याचा यत्न केलेला असून उभयतांचेंही ध्येय जें सच्चिदानंद-स्वरूपी परब्रह्म त्याची सिद्धि कशी होते, इतर मतें कोटिक्रमाला कशीं लंगडीं पडतात व त्यामुळें उप-निषदांनीं निर्दिष्ट केलेलें व आचार्यादिकांनीं सजवि-लेलें एकमेवाद्वितीय चिद्ब्रह्मच मान्य करणें शेवटीं कसें भाग पडतें तें दाखविलें आहे. भूमितीच्या सिद्धिसाधनपद्धतींत इतर सर्व कल्पना तर्कदुष्ट असल्यामुळें उरलेली एकच एक कल्पना वास्तविक होय असें ठरविण्याची जी रीत आहे, तिचाच अवलंब अद्वैतसिद्धांत प्रतिपादितांना शेवटीं तार्किक पद्धतींत करण्यांत येतो व प्रस्तुत निबंधांतही तसेंच केलेलें आहे. प्राचीन अद्वैतवेदान्तपंडितांना पाश्चात्य तत्त्वज्ञानपद्धतीची प्रत्यक्ष ओळख नसली,तरी सांख्य, वैशेषिक, केवल जडवादी चार्वाक, बौद्ध इत्यादि भिन्न भिन्न मतवाद्यांच्या प्रतिपादनांत पाश्चात्य तत्त्व-ज्ञान्यांच्या विविध छटा येऊन गेलेल्या असल्यामुळें, त्या छटांचें खंडन करूनच त्यांनीं अद्वैतसिद्धि केलेली असल्यामुळें, आधुनिक कुशाग्रबुद्धीच्या भारतीय तत्त्वज्ञानाभ्यासूंला पाश्चात्य मतांचें खंडन करण्याला अवश्य असणारे कोटिक्रम वारसाहक्कानेंच मिळालेले आहेत. पण त्यांचा उपयोग करतांनाही चातुर्य लागतेंच. पाश्चात्य तत्त्वज्ञानांतही उत्क्रांतिनियमान्वयें नवीन नवीन पुढें येणारे वाद जुन्यांचें कोटिक्रमानें खंडन करीत करीतच पुढें येत आहेत. त्या कोटि-क्रमांचाही उपयोग चाणाक्ष बुद्धीच्या अभ्यासूला सह-जच होतो. अशा दोन्हीकडच्या कोटिक्रमांचा अवश्य तो उपयोग करून श्री.नाईक यांनीं 'अद्वैतवेदान्त' या निबंधरूपानें आपला वेदान्तविषयक प्राथमिक अभ्यास तत्त्वज्ञानेच्छु वाचकांपुढें ठेविला आहे.

या निबंधांत नऊ प्रकरणांतून विषयाचें विवेचन केलेलें आहे. अद्वैत वेदान्ताचें अध्ययन न केले-ल्यांनाही आतां 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' हें वचन पाठ झालेलें आहे. या जगन्मिथ्यात्वावर जितके थट्टेचे कोटि-क्रम करण्यांत येतात, तितके कदाचित् दुसऱ्या कोण-त्याही विषयावर येत नसतील. तेव्हां जगन्मिथ्यात्वाची कल्पना तरी काय आहे हें समजून घेणें वेदान्ताभ्या-सूला अवश्य आहे. यास्तव तोच विषय श्री. नाईक यांनीं प्रथम विवेचनास घेऊन मिथ्यात्वाचा अर्थ स्पष्ट केला आहे. याविषयींच्या विवेचनाचा इत्यर्थ 'प्रमाणज्ञानजन्य भावअभावरूप प्रपंचज्ञान म्हणजे तत्त्ववेदक ज्ञान नाहीं,' या कारणास्तव इंद्रियांच्या द्वारा भावअभावरूप जगाचें जें ज्ञान होतें असें आपण म्हणतों तें मिथ्या होय, असा आहे. या विवेचनांत इंद्रियें व दृश्यसृष्टि म्हणजे इंद्रियज्ञानाचा विषय या दोन गोष्टींचा विचार करतांना दृश्यसृष्टीचें वास्तविक स्वरूप काय आहे, तिला जें अस्तित्व आहे असें इंद्रियांना वाटतें तसें तें खरोखर आहे कीं काय, असा प्रश्न उत्पन्न होतो. त्यासाठीं 'दृश्याबद्दल




अनुक्रमणिका

कांहीं पाश्चात्यांचे विचार' हें प्रकरण अवतरलें असून त्यांत वस्तुवाद, नववस्तुवाद, चिकित्सकवस्तुवाद, इत्यादि वादांचें स्वरूप संक्षिप्त रीतीनें देऊन त्या-विषयींचीं सी. डी. ब्रॉड व बर्‌ट्राण्ड रसेल यांचीं मतें दिलीं आहेत. दृश्य जगाचें मिथ्यात्व प्रतिपादन करणें हा जो या निबंधाचा मुख्य हेतु, त्याच्या पुष्ट्यर्थ इंद्रियगोचर होणारें सर्व जग केवळ भ्रमरूप असण्याचा संभव आहे असें जें रसेलचें म्हणणें आहे, तें देऊन या प्रकरणाची समाप्ति केली आहे. पुढील प्रकरणाचा विषय ' विषयप्रामाण्यविवेचन ' असा असून त्यांत विषयाला म्हणजे दृश्य सृष्टीला वास्तविक अस्तित्व आहे असें धरून चालण्यांत अन्योन्याश्रय दोष कसा उत्पन्न होतो तें सांगितलें आहे व तदनुसार विषयाचें अस्तित्व म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून त्याची ज्ञातताच होय; म्हणजे विषयाच्या अस्तित्वाची प्रतीति येते, ही तो विषयच स्वतःसिद्ध असल्यामुळें येते असें नसून ज्ञानाच्या अबाधित अस्तित्वामुळें येते असा निष्कर्ष काढिला आहे. या विवेचनांत अद्वैतमतांतील दृष्टिसृष्टिवाद व सृष्टिदृष्टिवाद या मतांचा संबंध येत असल्यामुळें पुढील प्रकरणांत त्यांचाच विचार केला आहे. हे दोन्ही वाद विषयाला वास्तविक अस्तित्व नाहीं असेंच मानणारे आहेत. पण विषयाचें ज्ञान होण्यापूर्वी चैतन्यावर त्याचा भास उत्पन्न होऊन मग तो विषय भासतो म्हणजे त्याचें ज्ञान झालें असें वाटतें, असें सृष्टिदृष्टिवाद्यांचें म्हणणें असून, दृष्टीपुढें सृष्टि, तत्पूर्वी कांहीं नाहीं असें दृष्टिसृष्टिवादाचें तात्पर्य आहे. पण एकंदरींत भासमान होणाऱ्या जड सृष्टीला वास्तविक म्हणजे अबाधित सत्ता किंवा अस्तित्व नाहीं याविषयीं दोन्ही वाद्यांचें ऐकमत्य आहे.

यानंतरच्या प्रकरणांत श्रीमच्छंकराचार्यांचा मायावाद व ज्ञानेश्वरमहाराजांचा अजातवाद यांतील मुख्य सिद्धांत एकच असून त्यांकडे पाहण्याच्या दृष्टि-कोणामुळेंच त्यांत सकृद्दर्शनीं मतभेद दिसतो असें प्रतिपादिलें आहे. केवळ निर्विकार अशा एकमेवा-द्वितीय ब्रह्मावर जड सृष्टीचा अध्यास अथवा आरोप करण्यांत येतो व तसा तो मायेमुळें होतो आणि माया ही आहे कीं नाहीं अशा स्वरूपाची आहे, असा मायावादाचा आशय आहे; तर जडसृष्टि ही झालेलीच नाहीं असा अजातवादाचा पक्ष आहे. ज्ञानेश्वरांनीं अमृतानुभवांत दृश्य सृष्टीचें वर्णन करतांना तिला कोंवळें ऊन गोळा करून त्याच्या केलेल्या उसरीची उपमा दिली आहे व शांकरमतानुयायी सुद्धां 'एष वंध्यासुतोयाति' इत्यादि शब्दांनींच दृश्यसृष्टीचें वर्णन करतात. तेव्हां तात्पर्य पाहिलें तर दोघांचें एकच आहे हें उघड आहे. हें तात्पर्य म्हणजे निरुपाधिक सत्ता हें असून त्याचा विचार यानंतरच्या प्रकरणांत केला आहे. या निरुपाधिक सत्तेची सिद्धि म्हणजे काय हें सांगून व नंतर वृत्ति म्हणजे विषय–विषयी यांच्या संबंधाचें विवेचन करून निबंध संपविला आहे.

श्री. नाईक यांचा हा निबंध म्हणजे अद्वैत-वेदांताचा प्राथमिक अभ्यास अर्थात् अद्वैतवेदान्त ही काय चीज आहे हें समजून घेण्याचा प्रयत्न होय असें त्यांनीं स्वतः म्हटलें आहे खरें; पण तो वाचून पाहतां तो वेदान्ताचा मूळापासून अभ्यास करणाराला अत्यंत दुर्ज्ञेय असा झाला आहे. वेदान्तपरिभाषा, अद्वैतसिद्धि, चित्सुखी, वेदान्तसिद्धान्तमुक्तावलि, अमृतानुभव इत्यादि बड्या वैदिक ग्रंथांतील व त्यांवरील टीकांतील कोटिक्रमाच्या पायावर बोजड तात्त्विक पारिभाषिक शब्दांची योजना करून केलेलें विवेचन प्राथमिक अभ्यासासाठीं आहे, हें म्हणणें



जुळत नाहीं. हा अभ्यास प्राथमिक समजून पुढें पाऊल टाकणारा प्रत्यक्ष ज्ञानोबारायच पाहिजे, सामान्य बुद्धिमान् पुरुषाला या निबंधापासून वेदान्ताचा अभ्यास करणें दुष्करच आहे. वेदान्ताचा कंटाळा येऊन पुरे झालें हें भारूड असें म्हणून घेणाराला हें पुस्तक चांगलें सहायक होईल.

विषयप्रतिपादनाच्या दृष्टीनें अशी स्थिति सांगितल्यावर त्या प्रतिपादनाचा उपयोग काय असाही प्रश्न उपस्थित होतो. तत्त्वज्ञानाचा दुसरा उपयोग कांहीं नाहीं, तो केवळ बौद्धिक कसरतीचें साधन आहे, असें म्हणावयाचें नसेल तर त्याचा उपयोग काय हें स्पष्टपणें सांगणें अवश्य आहे. आमच्या वेदान्तग्रंथांत तसें सांगितलें असतें. ग्रंथाचा अधिकारी वाचक कोण, त्याची पूर्वतयारी किती पाहिजे, ग्रंथाचा विशेष काय व त्याचें प्रयोजन काय हें आमच्या वेदान्तग्रंथांत प्रथम सांगितलें असतें. वेदान्तावरील प्राथमिक अभ्यासाच्या पुस्तकांत तर गोष्टींना प्राधान्य दिलें पाहिजे. पण प्रस्तुत ग्रंथांतील सारें विवेचन बऱ्याच गोष्टी गृहीत धरून व वाचक वेदान्तग्रंथांच्या वाचनांत मुरलेला तसाच पाश्चात्य तत्त्वज्ञानाचेंही आपततः ज्ञान असलेला असा समजून केलेलें आहे. प्राथमिक अभ्यास या दृष्टीनें विषयविवेचन अत्यंत सोप्या पद्धतीनें व्हावयास पाहिजे व त्याच्या वाचनानें वेदान्ताचे मूल ग्रंथ जीं उपनिषदें त्यांच्या वाचनाची अभिरुचि उत्पन्न झाली पाहिजे. या दृष्टीनें प्राथमिक अभ्यास म्हटला तर वेदान्तसाराच्या धर्तीवर उपनिषदांच्या आधारानें तो केला पाहिजे. वेदान्तांत अग्रगण्य प्रमाण म्हणजे उपनिषदें. इतर प्रमाणें व कोटिक्रम केवळ तोंडीं-लावणीं होत. वेदान्तांतच काय, पण पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांत तरी अन्तिम सिद्धान्त खास कोटिक्रमानें कोठें सिद्ध केलेला असतो ? शाब्दप्रमाणाचीच तेथेंही कास धरलेली असते. दोघांत भेद एवढाच कीं, आमच्याकडे शाब्दप्रमाण म्हणजे वेद आणि पाश्चात्यांमध्यें लेखकाच्या मनांत स्फूर्त झालेली कल्पना त्याची जागा पटकावते. प्रस्तुत निबंधांत तरी अन्तिम सिद्धान्त गृहीत धरलेलाच असून मुख्य भार कोटिक्रमावर नाहींच. मग प्रथमारंभींच बोजड शब्द, गृहीत कल्पना इत्यादिकांची कास कां धरावी ? असो.

श्री. नाईक यांचा वेदान्तदर्शनाचा अभ्यास उच्च प्रतीचा असल्यामुळें त्यांना प्राथमिक अभ्यासूंना सुगम असें पुस्तक लिहिणें शक्य आहे. तसा त्यांनीं अवश्य प्रयत्न करावा, अशी विनंती करून त्यांच्या निबंधाचें हें अल्प परीक्षण येथेंच संपवितों.

—के. ल. ओगले

---




अनुक्रमणिका

# नैषधसार

( मागील अंकावरून चालू )

आतांच अंकुरति हे नृपवंश कां न ? ।
वीरां कसे प्रसवती करिनाशकां न ? ॥
होती न खण्डित रणांत परप्रहारें ? ।
हे पावती पतन काय दुजा प्रकारें ?" ॥ ४ ॥
बोले तया त्वरित नारद "सांगतों मी ।
वृत्तान्त जो युवमदप्रद साङ्ग तो मी ॥
त्याचा विचार करुनी मनिं नीट पाहें ।
वीरां अनागमनकारण थोर आहे ॥ ५ ॥
भीमभूपदुहिता दमयन्ती ।
मर्मभिद् मदनशस्त्र वसन्तीं ॥
रत्न केवळ अनर्घ कुमारी
विश्वजित् भुवनभूषणनारी. ॥ ६ ॥
रूपोत्कर्ष तिचा प्रतिक्षणिं घडे त्या यौवनाच्या जवें ।
एका ती तरुणा भजे; परि तिला काणा न तें सांगवे ॥
आहे तो भरला शिखान्त सगळा पुण्यें नखारंभही ।
लावण्या न तिच्या, न तत्सुकृतिला ठेवी इयत्ता मही. ॥ ७ ॥
तातें मांडियलें स्वयंवर तिथें भूपांस नाहीं मिति. ।
संग्रामाहुनि त्यां स्वयंवर रुचे, स्वर्गाहुनी भूमि ती॥
त्यांतें इंद्रपुरी नको, पळति ते त्या कुण्डिनाच्या-कडे ।
दिव्यस्त्री नलगे तयां, अधिकची ती भीमजा आवडे." ॥ ८ ॥
ऐसें वदोनि मुनि तो परतोनि जातां ।
इन्द्रा म्हणे "शपथ ! जा बस ! ये न आतां !" ॥
जाई तथापि मुनिमागुनि आग्रहेंच ।
आतिथ्य-पूर्ण मुनिचें करुं चित्तिं हेंच. ॥ ९ ॥
भैमीविवाहोत्सुक हा सुरेश ।
झाला. शचीला रुचलें न लेश. ॥
विलोभिला तत्पति ही नवीन ।
"विपद्" म्हणे ती "कशि मानवी न ?" ॥१०॥
देवेन्द्र कुण्डिनपथें पुढतीं निघाला ।
मागून मार्ग वरुणाग्नियमांस झाला. ॥
काढावया पथ नवा जर एक लाधे ।
लोकीं गतानुगतिकत्व बहूंस साधे. ॥ ११ ॥
स्वर्गाहुनी विबुध येति धरातला हें ।
आश्चर्यकारक खरोखर वृत्त आहे. ।
ज्या स्वर्ग बोलति असें स्थल रूढ काय ? ।
तो स्वर्ग, जेथ चल चालुन चित्त जाय ! ॥ १२ ॥
मार्गीं निःस्वन त्या क्षणीं परिसिला त्यांनीं घनांचा स्वन ।
त्यांलागीं दुसऱ्या क्षणीं उदधिचें तो वाटलें गर्जन ॥
दोन्हीं संभवती क्रमें. निकट तों त्यांतें दिसे स्यंदन; ।
त्यामाजी नल भूप अश्वहृदयज्ञानी जनानन्दन. ॥ १३ ॥
पाहून रूप रमणीय तदा नलाचें ।
जागीं थिजे वरुण होउन मूक वाचे; ॥
काळें पडे अधिक आनन त्या यमाचें ।
त्या प्राप्त नाम मग काळ यथार्थ साचें ! ॥१४॥
अनल म्हणतो "केलें मातें नसे विधिनें नल ।
म्हणुनि मिळणें भैमी झाली अशक्यचि केवल ॥
अशि* अनलता माझी मातें गमे बहु आपदा ।
नलरुचिरता दे तापातें कशी अनला वदा!"॥१५॥
रूपानें कमनीय कामहि जयें धिक्कारिला त्या नला ।
देखाया उघडी सहस्र नयनां राजा सुरांचा भला ॥

---

* नलाचें रूप पाहून प्रत्येक देवाची भैमीप्राप्ति-विषयीं निराशा झाली. नळासारखा सुन्दर वर पाहिल्यावर आम्हांपैकीं एकाला भैमी कशी वरणार हा विचार अग्नीच्या मनांत येऊन तो म्हणतो. "मी अग्नि (अनल) म्हणजे मी नल नव्हे; व नल नव्हे–नलासारखा सुन्दर नव्हे–म्हणून भैमीची प्राप्ति मला अशक्य होऊन माझ्या वर मोठी आपदा आली आहे. दुसऱ्याला ताप देणारा जो मी अनल, त्याला नल कसा ताप देत आहे ?




अनुक्रमणिका

रूपानें निरखी न जों स्वपर तों त्याची उडोनी प्रभा, ।
बोले कौशिक सार्थची घुबड मी आहें नलाशीं उभा. ॥ १६ ॥

भीमाच्या घरचा स्वयंवर, पुढें त्या कुण्डिनाचा पथ ।
देवांना कळलें खरें, नल कुठें घेवोनि जातो रथ. ॥
राजा नैषध भूषणैक महिचा हा नोवरा पारखी ।
सारे त्या स्तविती, वधू मिळवि हा त्या भीमजेसारखी ॥ १७॥

पाही सुरेश, वरुणाग्नियमांस कष्टी ।
कर्तव्यमूढ व परस्परदत्तदृष्टि ।
ज्याचें असे कपट सर्व सुरांत उंची ।
देवेंद्र युक्ति करितो नलवंचनाची. ॥ १८ ॥
बोले सुरेश "कुशली असशी नला ! का ? ।
तूं वीरसेननृपपुत्र खराच बांका ॥
अर्धासनोचित सुहृद् मम वीरसेन ।
तत्साम्य काय तव रूपिं गड्या असे न ? ॥१९॥
हा काल दण्डधर, ज्या यम नाम लोकीं ॥
ज्वालामुखी जटिल अग्नि दुजा विलोकीं ॥
स्वामी तिजा अनवगाह्य अशा जलाचा ।
देवेन्द्र आणि चवथा रिपु मी बलाचा. ॥२०॥
तात्पर्य हें समज त्यांत विशेष नाहीं ।
आलों नला ! धरुन अर्थ मनांत कांहीं. ॥
अध्वश्रमापहर घेउनि मी विसावा ।
सारें कथीन, न वितर्क मनीं असावा. " ॥२१॥

ऐशी बोलुनियां शचीपति गिरा पूर्वोक्त जी त्या सजे
सोडोनी वदणें पुढें अधिक तो मूकत्व आतां भजे. ॥
भाषेचा चतुर प्रकार अवघा नाही मुळीं वाउगा ।
जन्मापासुनचा बृहस्पति नसे याचा गुरू बा उगा २२॥
" आलों अर्थ धरून " हें वच करी भूपास रोमांचित ।
" देवां दुर्लभ जें " म्हणे नल " मला तें लभ्य कैसें हित ? ॥
पात्रापात्र न पाहिलें, न गणिलें देतां कधीं जीविता ।
द्यावी कोठुन जीविताधिक अशी मी वस्तु इन्द्रा अतां ! ॥ २३ ॥

सोळावी न कळा जिची सजतसे पृथ्वीस ज्या निश्चयें।
त्या पृथ्वीहुन वा धनाहुन जिला मी थोर मानीं स्वयें ॥
राहे मद्हृदयींच आज नुसती अद्यापि माझी न जी।
ती भैमी दुसऱ्या न देय म्हणुनी उद्वेग वाटे अजी. ॥ २४ ॥

इच्छा मला समजण्यास उपाय काय ।
देईन मी खचित मागितल्या शिवाय ॥
आधीं मनोगत कळूनहि, याचनेची ।
पाहून वाट अधमाहुन कोण वेंची ? २५ ॥
लावोनियां प्रिय व दीन वचा वदाया ।
लज्जापराभव तशांतुन भासवाया ॥
मागावया फिरुन पाडुन याचकाला ।
दाता अलोप्य करतो बहु पातकाला ! २६ ॥
जो जन्मुनी अर्थिमनोरथांतें ।
देऊनि दानें पुरवीत हातें ॥
त्याचाच या भूमिस भार साचा ।
न सागराचा, गिरिंचा, द्रुमांचा ! ॥२७॥

बोले त्यां नल "दातृवर्ग त्यजुनी त्या कल्पवृक्षासम ।
इन्द्रादी सुर मानवां विनविती प्रख्याति ही उत्तम ॥
कोठें उत्तम अल्प तें फल तरी कोठें भवद्दर्शन ?।
आलें थोर फलास पैतृक असे तें थोर पुण्यार्जन. २८
मागा जीविततुल्य वा अधिकही जी 'वस्तु ती बालक ।
तुम्हां अर्पिल हा; विचार मनिं कीं व्हावे सुखी याचक. " ॥

" जा तूं होउन दूत शक्र वदला भैमीविवाहोत्सवा ।
भैमीप्राप्ति करून देशिल अम्हां हा काम या वासवा ॥२९॥

क्षितिवरी शतसंख्यहि भूप ते ।
जलधिरूपचि तूं; परि कूप ते ॥
ग्रहहि ते गगनीं किति जागती ।
रविपुढें लपल्याविण ना गति ! " ॥३०॥
जों जों करी वच सुरेश्वर तोंच तोंच ।
येती नला कळुन आंतिल डावपेंच ॥
योजी तशी नृप सलाघव शब्दजाति ॥
मायाविला उचित मायिक एक नीति. ॥ ३१ ॥



"आहे सत्कृति देव हो! न पदरीं मानीन आज्ञा तरी।
येतें दुष्कृत आड जें मिळविलें म्यां पूर्वजन्मांतरीं ॥
तुम्ही सर्वचि जाणतां उचित का जें मौन तें उत्तर।
तेणें संमति ये दिसून-म्हणुं का मी स्पष्ट "नाहीं" तर. ॥३२॥

संकल्परूप-न खरी-हृदयीं वसून।
ठेवी सजीव मज, तीच खरी बघून ॥
दावूं कसे सकल सात्विक भाव पाहीं?।
रूपादि हे विषय दुर्जय पंडितांही. ॥ ३३ ॥

टाळोनियां पुरुष जे करिती पहारे।
अंतःपुरीं शिरुनियां उघडून दारें ॥
भेटावया पुरुष जो अशि वाट मारी।
विश्वास ठेविल तयावर का कुमारी?॥ ३४ ॥

भैमीच्या करितां तुम्ही करितसां दिक्पाल जे याचना।
ते माझे गुरु, भीमजा मिळवुनी शिष्यास कां द्याच ना?
नाहीं दूत्य मला असें उचित हें कष्टी न व्हावें मनीं॥
कांहींही दुरुपाय साध्य न करी वर्जून हांसें जनीं!" ॥ ३५ ॥

बोले बलारि * "न" मुळाक्षर पाठ केलें।
बाल्यीं तुवां न; अथ विस्मरणास नेलें! ॥
दोल्यावरी बसविलेंस न याचकां तूं।
देशी नकार मग आज उगाच कां तूं?" ॥३६॥

इन्द्रें सिद्धि दिली विलक्षण जिणें सामर्थ्य आलें नला।
व्हाया दृश्य अदृश्य वेळ बघुनी जायास इष्ट स्थला॥
ऐकोनी प्रिय उक्ति कुण्डिनपुरा वैदर्भिचा कामुक।
जायातें उठला जरी जड किती तें दूत्य त्या ठाउक. ॥ ३७ ॥

---

* बलारि ( इंद्र ) म्हणतो, तूं बाळपणीं जेव्हां लिहावयास शिकलास तेव्हां तूं "न" हें नकारार्थी मूळाक्षर पाठ केलें नाहींस अथवा केलें असल्यास विसरलास. तूं मागें कधींही संशयांत याचकाला टाकिलें नाहींस आणि यापुढेंही टाकूं नकोस.

## सर्ग ६

(भैमीच्या प्रासादांत प्रवेश केल्यावर नळ भैमीच्या सख्यांचा विलास पाहतो व देवांची दूती भैमीशीं देवांच्या वतीनें दूतकर्म करीत असतां भैमी तिचें खण्डन करीत आहे असें ऐकतो व अंगावर घेतलेलें दूतकर्म जाचत असतां समाधानानें विसावा घेतो.)

साक्षात् जी अमरावतीच लपली त्या कुण्डिनाख्यें पदें।
गांठोनी नल ती मनोरथजवें कोणा कळोंही न दे ॥
राजा होउन चोरसा लपुनियां जायास लाजे नल।
भैमीदर्शनभाव त्यास सुख दे; दूतत्व मांडी छल. ॥१॥
भैमी त्यास दिसे मनोमय पुढें अंतःपुरीं पाहतां।
बाटे ती क्षणिं सानुराग बघते आलिंगनेच्छु अतां ॥
नेते मागुनियां विलोभुन पुन्हां त्या केलिकोपेक्षणें।
माया भासतसे प्रवृत्तिपर ती मिथ्या कशी मानणें! ॥२॥
आतां दिक्पतिंचा निरोप अवघा जल्पोनियां अल्प तो।
लागे भ्रान्तिकृत प्रियेस नच जों सांगावया भूप तों ॥
"आहे भूत इथें अदृश्य" करिती कल्होळ बाला भयें
भैमीभास उडोनि सावध पुरा, भूपाल झाला तयें. ॥३॥
कोणी सुन्दर कामिनी निज विलासांच्या गुणांनीं किती
जाळीं दीर्घ विणोनियां पसरुनी अंतःपुरीं टाकिती ॥
'त्यांमाजी नलदृष्टि कृष्णमृग हा मातें न कां सांपडे'।
मोठा प्रश्न असा अहो! मनसिजा त्या पारध्याला पडे! ४

प्रासादाच्या सात लंघोन माड्या।
याच्या त्याच्या कां भरोनी न मांड्या ॥
भैमीचिन्ताक्रान्त तो श्रान्त, थोडी।
विश्रान्तीची बैसुनी सेवि गोडी. ॥ ५ ॥
संचार सावधपणें करितां असाही।
भैमीसखीशतसभा नळराज पाही ॥
होई तया सरस पाहुनि केलि, भास।
हें स्थान होय रतिचें करण्या विलास. ॥ ६ ॥

गातां ऐकुनि कम्बुकण्ठिस तिच्या पाहून रेषा गळीं।
आश्चर्यें नृप मानसीं स्तुति करी बाळा दिसे आगळी॥
मातें कंठ हिचा त्रिरेख सुचवी कीं वेणु, वीणा, पिक।
केले मी जित, वाहतों म्हणुनियां हें स्पष्ट रेषात्रिक ७॥






अनुक्रमणिका

" हा पाहीं दमयन्ति ! तो नल तुझा ज्याच्या-
वरी त्वन्मन; ।
" पीडा सोड वियोगजन्य " वचनें व्हाया
तिचें सांत्वन ॥
वारंवार सखीसमूह वदवी जीं सारिकांच्या मुखें।
ऐकोनी नल तीं म्हणे वदति या कां पाहिल्यासारखें ! ८

भैमी कुणी होउनि वेषधारी ।
असत्य होई नल अन्य नारी ॥
ह्याच्या गळां ती मग हार आली ।*
भैमीविनोदार्थ सलज्ज घाली ॥९॥

"कुणी गेला वाटे पुरुष करुनी स्पर्श मजला ।
दिसोनी तच्छाया कवण परि नाहीं उमजला ! ॥
अहो माझ्या कानीं वचन पडलें तर्क करितें," ।
स्त्रियांचें हें ऐसें नृपति परिसे भाषण रितें. ॥१०॥

अंबेला प्रणिपात तों करुनियां भैमी तिथें पातली ॥
येई ओळखतां न ती परि नला वाटे असत्यांतली !॥
होता तो सकळां अदृश्य पहिल्यापासोनियां भूपति ।
झाली काय परस्परांस असुनी नाहीं अशीं सम्प्रति !
॥ ११ ॥

गुम्फी हार सखी तियेस वदली भैमी "भलें गे! भलें !
दे ! दे ! साहस सोडुनी वद कसें मैत्रीणिला शोभलें !
पीडा जो मजें दे तयास करिशी साहाय्य तूं आयतें.
देशी पुष्पित बाण सज्ज करुनी कामा नव्हे काय ते ?"
॥ १२ ॥

भैमीसमीप नल कांचनहंसपक्षी ।
ताम्बूलधारक महोज्ज्वल एक लक्षी ॥
दूत प्रियाप्रहित हंस महोपकारी ।
होई असा मग नला दृढ मोह भारी. ॥ १३॥

लावण्य ताडून सखीसमाजीं ।
भैमी असावी मग हीच आजी ।
असें मनीं भूप अदृश्य जाणें ।
आतां म्हणे यापुढतीं न जाणें. ॥ १४ ॥

* सखी

दूती यमाग्निवरुणेन्द्रविसृष्ट दक्ष ।
भैमीस दीन वच तों वदली समक्ष ॥
" सप्रेम भेट तुज देउन दानवारि ।"
" आहे तुझें कुशल काय ? असें विचारी
॥ १५ ॥

स्वर्लोक एक चवदा भवनीं प्रधान ।
तेथें प्रशस्त दुसरें न सुरांसमान ॥
इन्द्रास देति सुर सर्व मिळून मान ।
तो इन्द्र दास तव तूंच वरिष्ठ कां न ?" ॥१६।

दूती बोलुनियां असें करि पुढें माला बहू आदरें ।
भैमी ती मघवत्प्रसाद म्हणुनी घेई उठोनी करें ॥
नाहीं एक दिशा जियेंत भरला सर्वत्र आमोद न ।
जातां शोधुं परन्तु एक दिसलें-झाला नला मोद न. ।
॥ १७ ॥

" आर्यें " म्हणे एक " पुरे विचार " ॥
दासी दुजी " इन्द्र पसंत फार " ॥
तिजी वदे " उत्तर योग्य 'होय' ।
तुझें तयें मङ्गल सर्व होय. " ॥ १८ ॥

भैमी बोले " इन्द्र हा सर्वसाक्षी ।
माझ्याही तो मानसा नीट लक्षी ॥
ज्ञात्या देतां उत्तर व्यर्थ जाण ।
चित्तीं ठेवी उत्तराशा अजाण. ॥ १९ ॥

आज्ञा करील जर आपण वज्रपाणि ।
कोणी नकारपरुषा न वदेल वाणी ॥
आज्ञास्वरूप शिरिं वाहुन पुष्पमाला ।
बोलोनियां वर करी अपराध बाला. ॥२०॥

देवोनियां मन नला, तव आज वाचा ।
म्यां ऐकिली स्तवचि कीं पर-वासवाचा ॥
हें पाप धारण करी अतितीव्रतेला ।
देई प्रचण्ड मज दुःख पतिव्रतेला. ॥२१॥

* " क्षत्रं पृच्छेदनामयम् " या मनुवचनानुरूप हा कुशल प्रश्न आहे.




अनुक्रमणिका

लोकांस सावध करी भगवान काळीं* ।
कीं साधु पुण्य सरतां उतरेल खालीं ॥
तो स्वर्ग इष्ट न मला, नच इन्द्र तोही ।
मद्बुद्धि केवळ नलींच सदा रतो ही. ॥ २२ ॥
देई सोडुनि भीमजा वच मधें दूतीसवें आपलें ।
इन्द्राला वरणें खरेंच बरवें ऐसें सख्यां वाटलें ॥
बोलाया मुखपंकजें उघडती जों ओष्ठरूपी दलें ।
तों भैमी करण्या निषेध वदली वेळींच चित्तांतलें॥२३॥
" संबन्ध भैमीनललक्षणाचा ।
युगान्तरींचा नच हा क्षणाचा ॥
योजून वाक् जी वदण्या न जोगी ।
वक्ताच वक्त्रश्रमकर्म भोगी ॥ २४ ॥
खातो वस्तु मऊ मऊ पुरुष जो, उंटास तो निन्दितो ।
कांटे खाउनि उंट,जो मउमऊ खातो, तया हांसतो॥
आहे आवड गोड. ती बघुनियां खाणें नसे वाउगें ।
मध्यस्थेंच हसूं नये; म्हणुनियां तुम्हीं बसावें उगें"२५॥
दूतीस नाहिं उरला वचनावकाश ।
जाई निघून घडतां कृतहेतुनाश ॥
आला पुन्हां परत जीव गमे नलाला ।
भैमी, प्रनष्ट निधि, काय जसा मिळाला. ॥ २६ ॥

---

## सर्ग ७

( भैमीला पाहून मुखापासून नखापर्यंत तिच्या रूपाची नळ वाखाणणी करतो. भैमी ही नळाचें व्यक्तरूप पाहून स्तिमित होते. तुम्ही कोण ? कां आलेत ? इत्यादि प्रश्न त्याला विचारते. )

दूतीविसर्जन असें बघतां, नृपाला ।
वाटे मनोरथतरूस फुटून पाला ॥
आलीं तयावर फुलें व फळें क्षणानें ।
होई प्रहृष्ट नृपचित्त तदीक्षणानें. ॥ १ ॥
एकामागुन एक ते अवयव प्रेक्षावया तो निघे ।
त्याची दृष्टि समूरचा प्रथमची वक्त्रेन्दु पाहुनि घे ॥
भैमीचा अनुराग पूर्ण भरती आणी सुधासागरा ।
होती तों कुच उंच दोन बुडत्या दृष्टीस त्या आसरा. ॥ २ ॥

जावें कसें तिथुन दृष्टिस तें कळेना ।
दोहोंत सूतभर अंतर तें मिळेना ॥
मध्यें पडे अडकुनी मग होय थोडी ।
खोटी तियेस नच कारण एक गोडी. ॥ ३ ॥
आतां दृष्टि नितंबचक्र बघतां लागे भ्रमाया वरी ।
वाटे पावतसे जवें स्खलन ती, कोणी तिला नांवरी ॥
भैमीचे तंव ऊरु दोन कदलीस्तंभांपरी पाहतां ।
त्यांतें मारुन घट्ट दीर्घ विळखा दृष्टि स्थिरावे अतां ॥ ४ ॥
" ब्रह्म्यालाच मुळीं पदच्युत जरी केला " म्हणे तो मनीं ।
"केला स्थापित मन्मनोरथ म्हणा वा काम,सिंहासनीं॥
ऐशी अद्भुतरूप शिल्पघटना संभाव्य नाहीं तरी ।
प्रत्येकावयवांत रम्य इतकी आहे कुठें सुंदरी ! ॥५॥
चंद्राशीं मुख वर्तुलाकृति हिचें तोलो बिचारा कवि ।
आहे तें अकलंक वास्तविक हा आहे कलंकच्छवि ॥
नेत्रांचें जुळवी समीकरण त्या नीलोत्पलाशीं जरी ।
टाकी नेत्र कटाक्ष; शक्य नच हें नीलोत्पलातें तरी६॥
बिंबाशीं सम मानि ओष्ठ.समता ही होय रंगोद्भव ।
बिंबामाजि नसे, व निर्भर वसे ओष्ठीं सुधेची चव ॥
भैम्यंगें कविसंप्रदाय असले धिक्कारण्या लागलीं ॥
त्यायोगें उपमानसृष्टित किती उत्क्रान्ति ही जाहली!७॥
" चंद्रा तूं दिससी कसा !" वद गड्या "भैमीमुखा सारखा !"
"तूं रे ! उत्पल नील !" "मी तर तिच्या नेत्रांपरी, पारखा !" ॥
भैमीचा उपमानवर्ग सगळा हा चांगला चांगला ।
होवोनी उपमेय धन्य म्हणुनी नाचावया लागला!८॥
नाहीं आजवरी उगीच विधि हा निर्मीत आला स्त्रिया।
यापूर्वी वळवून हस्त रचि तो मागून भैमी प्रिया ।
भैमीनंतर हा करीत बसतो सृष्टि स्त्रियांची कशी ? ।
सांगे तो " मजही अशक्य रचणें स्त्री अन्य भैमी जशी. " ॥ ९ ॥
भैमीचा मुखरूप इन्दु उगवे जिंकोनि सारें तम ।
झालें प्राप्त तमास बन्धन मुखामागें स्थलीं उत्तम ॥

---

* 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' हें गीतावचन येथें उद्दिष्ट आहे.




अनुक्रमणिका

वेवोनी 'कच'नाम नूतन वसे तें तेथ संभावित ।
अंगीं बन्धनचिन्ह एक कथितें आहेस तूं बा जित १०

एाहूं अतां रम्य ललाट देश ।
झाला तमोलक्षण दीर्घ केश ॥
चंद्रार्ध त्याच्यावर कोरलेला ।
कृष्णाष्टमीरूपचि दे तियेला ! ॥११॥

केला शिवें मदनदाह तदाच पौष्प ।
काळें पडे त्वरित केसरशेष चाप ॥
कोपें द्विधा शिव करी; मग खण्ड हाता ।
येतां रची जणुं हिच्या भिवया विधाता. ॥१२॥

एके शरें वश करी स्मर एक लोक ।
ते लोक तीन वश तीन शरें विलोक ॥
ते दोन शेष शर कौसुम पंचकाचे ।
नेत्रीं हिच्या विधि करी अभिषिक्त साचे. ॥१३॥

जीचा सलील धरि मध्य अनंगमुष्टि ।
जी मत्प्रिया मृदुल कौसुम चापयष्टि ।
आतां तिची कुसुमजात अपांगदृष्टि ।
मोहावयास करि पुष्पशरौघवृष्टि. ॥१४॥

श्री जी वनीं हरिणिंनीं नयनद्वयाची ।
तूझ्याकडून ऋण मागुन घेतलेंची ॥
त्याचीच भीतहरिणींजवळून घेशी ।
हे ! भैमि । वाढिदिढिनें परतून राशी* ! ॥१५॥

आतां सहस्रांश तिच्या स्मिताचा ।
प्रसाद लाधेल विधूस टांचा ॥
करून नीरांजन कौमुदीचें ।
करील तो पूजन आज तीचें. ॥१६॥

एकाहुनी अधिकची सुकुमार आतां ।
अंगें रचीत असतां असतां विधाता ॥
भैमीगळीं अतिमृदुत्वसमाप्ति झाली ।
वाणींत ती मधुरता अतिरिक्त आली. ॥१७॥

सरस्वती कंठि हिच्या बसून ।
वीणा करें वाजविते बसून ॥
तो नाद होऊनि हिचीच वाचा ।
श्रोत्यांस दे स्वाद सुधारसाचा. ॥१८॥

अहो ! मासीं मासीं रजनि अंवसेला प्रकटते ।
विधूच्या बिम्बाचीं फिरुनि फिरुनी लोपति शतें ।
म्हणोनी का निर्मी विधि कुशल भैमीमुखशशी ।
जयाची श्री राहे, कधिं न जनिं पावे क्षय अशी? ॥१९॥

मातें बाहुलता हिच्या बघुनि ही वाटे नदी नर्मदा ।
दोन्ही बाजुंस रम्य आणिति जिच्या शोभा मृणाली सदा. ॥

उष्मा यौवनरूप आटवि तिचें तें बाल्यरूपी जल ।
तेणें हीं कुचरूप येति वरतीं बेटें कशीं उज्ज्वल !॥२० ॥
रूपें नाभि हिची विहीर पुढती गंभीर ही गावली ।
तैसे हे कुचरूप कुंभ जवळी, ही रज्जु रोमावली ॥
वस्त्रें वेष्टित हीं नसून उघडीं दृष्टीस येतीं जर ।
माझ्या दृष्टिचि सर्व आज शमती तृष्णा विरागें तर ॥ २१ ॥

* भ्रू होय चित्रलेखा, ऊरू रंभा तिलोत्तमा नासा ।
एकीस पाहतो तो पाहि अनेकांस अप्सरांस जसा. ॥ २२ ॥

झाल्या जगांत जितक्या तितक्या दिशांनीं ।
कामार्त ते शरण येतिल भूप मानी ॥
भैमी पदाब्ज धरतील. अजें † म्हणून ।
बोटें दहा तिज खुणा दिधल्या गणून. ॥ २३ ॥

ही सृष्टि होय विधिची अतिविश्व सारी ।
तारुण्य मारवि तिच्याकडुनी भरारी ॥
तीचें स्मरें अधिक कार्य विदग्ध केलें ।

*व्याज व मुद्दल यांची बेरीज.

* भैमीची भ्रू ' भिंवई ' चित्रलेखा आश्चर्यरूप आहे लेखा ( न्यास ) जिचा अशी रेखींव आहे. हिच्या ऊरू (मांड्या) रंभेचे ( कदलीचे ) केळीचे गाभे आहेत. हिची नासा ( नासिका ) तिलोत्तमा ( तिल पुष्पाहून उत्तम ) आहे. शिवाय चित्रलेखा, रंभा व तिलोत्तमा या नांवाच्या अप्सरा प्रसिद्ध आहेतच. भैमीला एकटीला पाहून इतक्या निरनिराळ्या अप्सरांना पाहिल्याचें प्रेक्षण-कौतुक (श्रेय) पाहणाऱ्याला मिळतें असा नळाच्या म्हणण्याचा भाव आहे. † ब्रह्मदेवानें



अनुक्रमणिका

त्याचें पुरें स्तवन वाक्पथपार गेलें. ॥ २४ ॥
केशांपासुनि वर्णितां अवनिप प्रत्यक्ष एनाक्षिला।
आश्चर्याम्बुधिच्या तरंगनिचयीं पोंहावया लागला.
मोदें चित्त उचंबळून सगळें वाटे तयाला झणीं।
द्यावें दर्शन भीमजेस, बसली जों ती सख्यांच्या गणीं ॥ २५ ॥

---

## सर्ग ८

( मी दिक्पालांचा दूत आहें. 'त्यांच्यांपैकीं एकाला वर' असा त्यांचा निरोप नळ भैमीला कळवतो व कोणत्याही नराला भुलूं नकोस असें म्हणतो. )

तो इन्द्रदत्तवर कामुक या नृपाला।
प्रच्छादण्या न बहुकाळ समर्थ झाला॥
झांका तृणेंकरुनि अंकुर तो उंसाचा।
होई तरी प्रकट तो स्वयमेव साचा. ॥१॥
बाला नलास बघुनी कुणि एक लाजे।
प्रौढा कुणी नृपतिकान्तिनिमग्न साजे॥
मानी तया स्मर असेंच कुणी कुमारी
झाली अनंगवश अन्य तशी बिचारी. ॥ २ ॥

भैमी या नल मानुनी क्षणभरी आसक्त जी त्यावरी।
ती अन्य क्षणिं कां निरुत्सुक ? 'कसा हा येथ अन्तःपुरीं ?'॥
त्याचें चित्त तिच्याकडेस वळुनी होई पुन्हा चंचल।
कां कीं भैम्यभिलाष चित्तिं धरण्या दूता नसावें बल. ३॥
होती बद्धमुखी सख्यांत बसली भैमी भयानें सती।
झांकाया निजभाव सात्विक करी जे यत्न ते नासती॥
थोडासा वर आननेन्दु करुनी होवोनियां ती स्वतां
वाक्यें छिन्न वदे जरा विरलशीं मंदस्वरानें अतां.॥४॥

" शिरीष पुष्पम्रदिमाभिमान।
ज्या या पदांनीं तव ठेविला न॥
त्यांना कुणी तुच्छदर्थे प्रवास।
सांगोनियां भोगविले प्रयास ? ॥ ५ ॥

सोडोनी दिधलें वसन्त ऋतुनें जें, त्या वनाची दशा।
देशी प्राप्त करोनि आज कुठल्या देशास सांगें कशा?
झालें मी असली कृतार्थ बघुनी तूतें. तुझें नाम तें।
आतां कर्णपथीं पडो तव मुखें सुश्राव्य सर्वा मतें ६॥

ऐसा प्रवेश तव, टाळुनि रक्षकांतें।
द्यातें समुद्र तरणेंच म्हणूं न कां तें ?॥
वाटे असेल तव गोत्र खरें सुरांचें !।
आहेस* मन्मथ ? न कार्य कलेवराचें ! ॥ ७ ॥
भस्मावशेष कुसुमायुध देहदाहें।
सौन्दर्यनाम उरलें न कुठें तदा हें॥
त्वद्देह निर्मिति पुन्हां करितां कृपाची।
झाली जगावरि पहा किति ईश्वराची ! ॥ ८ ॥

वर्णी वस्तु न जो गुणाद्भुत अशी जो बैसतो मूकसा॥
सोशी दुःसह शल्य तो.विफल हा वाग्जन्म झाला कसा?।
जल्पावें म्हणतील अल्प, रुचिही आहे खलाची खरी।
मांडी हा स्तुतिपाठ भाट बहुधा, ही भ्रान्ति लोकीं बरी. ॥ ९॥

आहेस मानव ? मही महनीय सर्व।
तूं देव ? तो अमरदेश करील गर्व.॥
केला अलंकृत तुवां जर सर्पलोक।
गेला सरून वर, खालिं न तो विलोक.॥ १०॥
जो वैरसेनि नल मन्मनिं नित्य वागे।
तो सृष्टिसिन्धुंत तुझें प्रतिबिंब लागे।
आहेस अन्य अथवा नल हा विकल्प।
पीडा मला करितसे बघ ती अनल्प. " ॥११॥

ऐकोनी प्रिय सानुराग वच हें सारें प्रियेचें नल।
गेला खोल सुधानदींत बुडुनी आकण्ठ तो केवल।
लोकांतें स्तुति नित्य शत्रुमुखिंची स्वादिष्ट लागे जर।
होते ती किति मिष्ट इष्टमुखिंची ? मापून सांगा ॥ तर ! ॥१२॥

वीणारवाची तिचि यास वाणी।
मोही; स्मराज्ञा मनिं तो न आणी.॥
जे धौत सन्मानस त्या विवेकें।
केलें कधीं दूषित कामपंकें ? ॥१३॥

---

* तुला मन्मथ म्हटलें तर तूं शरीरधारी आहेस! मन्मथ हा अनंग आहे.




अनुक्रमणिका

बोले नृपाल "मज दिक्पतिदूत मान ।
आलों तुझा अतिथि होउन कार्य सान ॥
आतां धरूनि हृदयिं प्रभुवाचिकातें ।
प्राणाहुनी अधिक मी न गणीन कां तें ? ॥१४॥
पोंचे मला अतिथिपूजन थांब ! थांब ! ॥
कां आसन त्यजिसि ? बैस नको विलम्ब ॥
हें दौत्य तूं सफल गे ! करशील भावें ।
आतिथ्य काय तव त्याविण हें निभावें ? ॥१५॥
आहेत अंगें तव का अरोगी ? ।
प्रसन्न जें, तें मन सौख्य भोगी. ॥?
आकर्णनेत्रे ! वच आयकें गे ! ।
मीं सांगतों प्रस्तुत कार्य वेगें. ॥ १६ ॥
बाल्यापासुनि सौष्ठवादिक तुझे जे गूण त्यांच्या गणें ।
जातां चित्त भुलून घालिति तुला दिक्पाल ते मागणें॥
देवांचा अधिराज इन्द्र, यम, तो जो भानुचा नंदन।
अंतर्भूत तयांत तो वरुणही तो अग्नि जो क्रोधन.
॥ १७ ॥

त्वत्प्राप्तिची स्फुरतसे हृदयांत आशा ।
पूर्वादिका विलसती न म्हणून आशा* ॥
आसक्तिभूमि मिळतांच नवी उदारा ।
ते मानिती रुचिर; हीन च आत्मदारा ॥ १८ ॥
वार्ता स्वयंवर तुझें भरणें उद्यांना ।
धारा सुधामयचि उत्सव देत यांना. ।
सोडोनि ते पथिं तहान व भूक सारी ॥
आले न घेउनि सवें लवही शिदोरी. ॥ १९ ॥
आसन्नवर्ति सुर चित्तिं धरून लोभा ।
आणोनियां मजसिं §जंगमलेखशोभा ।
द्याया निरोप तुजसीं मधुराक्षरांनीं ।
धाडोनियां तुजकडे दिधलें सुरांनीं ॥ २० ॥
‡आलिंगुनी तुजसिं देव पृथक् पृथक् ते ।
संदेश देति निज अल्प अवक्र वक्ते ॥
'आम्हांस मूर्च्छित करी स्मर एककल्ली ।
व्हायास सावध तुझ्याविण कोठ वल्ली ! ॥ २१ ॥
त्वत्कान्तिपान करुं ही नयनां पिपासा ।
त्यां धीर दे बहु मनोरथ एकलासा ॥
ऐसें प्रतारण किती दिन चालवावें ।
तें स्पष्ट सांग तव चित्त न कां लवावें ?॥ २२ ॥
होई दयोदय तुझ्या हृदयीं जरी गे।
स्वर्गास शोभविं, विलंब वृथा तरी गे !॥
ही जन्मभूच अथवा तव आवडीची ।
स्वर्गायमान करुं भू ; न कथा नडीची ॥ २३ ॥
वाणीचा तव खण्ड एक म्हणजे तो शर्कराखण्डची ।
बाकी इक्षुविकार, जाण सगळी ती शर्करा बंडची ॥
शृंगारादि रसोदकें भिजविते वाणी तुझी कच्छ जे ।
त्यांमाजी तृण माजलें म्हणुनची त्या नाम इक्षू सजे
॥ २४ ॥
वेगें वरीं अमरभाव अम्हांतला गे ? ।
ऐशी विनंति करण्या बहु निंद्य लागे ॥
आम्ही पदाम्बुज तुझें धरितों तराया ।
तारील तीर्ण बुडत्यास अतीर्ण वांया. ॥ २५ ॥
इन्द्रास तूं सुखविं अग्निस दाहमग्ना ।
क्रीडा करून नव, उद्धरिं पादमग्ना ॥
किंवा यमास अथवा वरुणा वरावें ।
माझें परी सफल दौत्य तुवां करावें" ॥२६॥

## सर्ग ९

( माझें चित्त नळावर आहे. दिक्पालांवर नाहीं असें दमयन्ती सांगते. "तूं वेडी तर नाहींस ना ? तूं सुरांला सोडून नळाला वरितेस ?" असें नळ विचारतो शेवटीं तिची स्थिति पाहून नळाला करुणा उत्पन्न होऊन मीच तो नळ आहें, रडूं नकोस, असें नळ सांगतो. प्रकट झाल्यानें दौत्यकर्म बिघडलें असें वाटून नळाला खेद होतो. त्यांचें सांत्वन हंस येऊन करतो व निघून जातो. )

*आशा म्हणजे दिशा. पूर्व ही इंद्राची. दक्षिण ही यमाची इत्यादि दिशा त्यास दिक्पालां आवडत नाहींशा झाल्या. § चालत्या बोलत्या पत्राची शोभा (रूप) मला देऊन. ‡ हा एक नमस्कारासारखा निरोप कळविण्याचा पूर्वीचा कांहीं आदरसत्कार दिसतो.



# गीतेचें व्यवहारदृष्ट्या निरीक्षण

## लेखांक १ ला

गीतेंत अमुक एक अंतिम सिद्धान्त प्रतिपादिला ाहे असें मानून तीवर अनेकांनीं टीका केलेल्या ाहेत. पण प्रस्तुत लेखांत तसा कांहीं सिद्धांत सांगा- ाचा नसून सरळ गीता वाचीत जाणारास तींत ाय काय दिसून येतें हेंच थोडक्यांत पाहावयाचें ाहे. गीतेला कृष्णार्जुनांच्या संवादाचें स्वरूप सल्यामुळें तो संवाद घडून येण्यास कोणता प्रसंग ारणीभूत झाला हें प्रथम सांगणें काव्यदृष्टीनें वश्य होतें व म्हणून ती गोष्ट पहिला सर्व अध्याय ाणि दुसऱ्याच्या आरंभींचे दहा श्लोक यांत सांगि- ली आहे. पुष्कळ दिवस वाटाघाट होऊन व वश्य ती सर्व सिद्धता करून पांडव निरुपाय होत्साते ौरवांशीं युद्ध करावयास उभे राहिले होते. अर्जुनानें पूर्वी अनेक लहानसहान युद्धें केलीं होतीं. रक्त- ताला तो पारखा होता असेंही नाहीं. शस्त्रास्त्रांची ाची सज्जता कांहीं उणी नव्हती. पण असें असतांही युद्धप्रसंगीं त्याच्या मनानें अगदीं आयत्या ळीं कच खाल्ली. अर्थात् ती साध्या भीतीनें नव्हती, करुणेनें किंवा गुरुबांधवादिकांच्या वधामुळें ापल्या हातून घडणाऱ्या पापाच्या भीतीनें होती. र्जुनाला वाटणारी ही भीति अयोग्य असली, तर ्यवहारदृष्ट्याच होय. म्हणून व्यवहारदृष्ट्या तिचें ाराकरण करणें कृष्णाला अवश्य वाटलें व त्याप्रमाणें ानें अनेक कोटिक्रम करून आपलें म्हणणें अर्जु- ाच्या गळीं उतरविलें आणि त्यामुळें कुतर्क टाकून 'करिष्ये वचनं तव'। (१८,७३) असें म्हणून र्जुन युद्ध करावयास सिद्ध झाला, असा भगवद्गीतेचा थितार्थ तिचे आदि आणि अन्त यांवरून दिसून तो व तदनुरूप गीतेंत इतर कितीही विषय आले सले, तरी ते सारे 'स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव' । (१८,७३) हे शब्द अर्जुनाच्या तोंडून काढून घेण्यासाठीं होत, त्या त्या विषयाच्या स्वतंत्र विवेचनासाठीं नव्हत, असें म्हणावें लागतें.

युद्ध करून स्वकीय व परकीय गणगोताचा नाश करणें हें पाप होय असा अर्जुनाचा भ्रमजन्य विचार, तर अवश्य झाल्यास युद्ध करणें व त्यांत अपरिहार्य म्हणून जो कोणी पुढें येईल त्याचा वध करणें हें जगाच्या रहाटींत पाप नाहीं, असा कृष्णाचा शेव- टचा निर्णय. कोणत्याही मनुष्याच्या हालचालींत दोन अंगें असतात; एक त्याचें आचरण आणि त्या आचरणाच्या बुडाशीं कांहीं तत्त्वें. हीं तत्त्वें इतरांच्या दृष्टीनें वंद्य, वा निंद्य कशींही असतील; पण त्या माणसाचा आचार सामान्यपणें त्या तत्त्वांना धरून असतो. जों जों मनुष्य खालच्या पायरीवर असतो, तों तों तीं तत्त्वें संकुचित स्वरूपाचीं असतात, व जों जों तो वरच्या पायरीवर जातो, तों तों तीं अधिकाधिक व्यापक होत जातात, एवढेंच. दुसऱ्याच्या आवारांत वेळींअवेळीं जाऊन मार खाण्याचा संभव असला, तरीही तेथील बागें- तील झाडेंरोपें खावयास सवकलेल्या बैलाच्या कृतीमागेंही कांहीं तत्त्व असतें आणि जनसमुदा- याचें दु:ख पाहून आपली शक्ति किती अल्प आहे हें जाणत असतांही त्या दु:खाच्या निरासार्थ शक्य तों झटणाऱ्या उदार पुरुषाच्या कृतीलाही कांहीं तरी तत्त्वाचाच पाठिंबा असतो. याप्रमाणें तत्त्व व कृति या जोडीची सांगड सर्वत्र आढळते. या जोडींत प्रथम उदय कोणाचा? व्यवहाराचा कीं तत्त्वाचा? या प्रश्नाचें इतिहासदृष्टीनें उत्तर द्याव- याचें तर प्रथम व्यवहार व मग तत्त्व किंवा शास्त्र असाच क्रम लागतो. पण एकदां हा आरंभाचा काल




अनुक्रमणिका

सोडला, म्हणजे पुढें मात्र बहुधा तत्त्वानुसारी व्यवहार असाच अनुक्रम दिसून येतो. म्हणूनच तत्त्वज्ञ पुरुष लोकांत तत्त्वांचा प्रसार करण्याचा कसून प्रयत्न करतात. तसाच प्रसंग उपस्थित झाला असतां युद्ध करून मनुष्यवध करणें अवश्य आहे, त्यांत कांहीं पाप नाहीं, ही गोष्ट तत्त्वप्रतिपादनानें स्थापित करण्याचा गीतेचा खटाटोप याच कारणास्तव झालेला आहे.

गीतेच्या या खटाटोपांत लोकांमध्यें तत्कालीं प्रचलित असलेल्या तत्त्वांचा परामर्श व अवश्य तेवढा उपयोग करून घेणें स्वाभाविक होतें, व तसा तो केलेला आहे. अर्जुनापुढें जो मोठा प्रश्न पडला होता, तो म्हणजे स्वजनांच्या वधाच्या पापाचा. 'पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः'। (१, ३६) 'स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव'। (१, ३७) 'अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्। यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः'। (१, ४५), इत्यादि शब्दांनीं व्यक्त केलेली अर्जुनाची तात्त्विक भीति घालवावयाची, तर प्रथम वध म्हणजे काय, तो वस्तुतः कोणाचा होतो व कोणाचा होत नाहीं, याचा ऊहापोह ज्ञातपूर्व तत्त्वांना अनुसरून शक्य तर केला पाहिजे. म्हणून त्याच प्रश्नाला प्रथम कृष्णानें हात घातला आणि आत्मा अमर आहे, जन्ममृत्यु आदि विकार होतात ते शरीराला होतात, आत्म्याला होत नाहींत, एक शरीर जुनें झालें म्हणजे तें टाकून आत्मा दुसरें नवें घेतो, त्यालाच त्याचा मृत्यु आणि जन्म म्हणतात आणि हे विकार शरीराच्या दृष्टीनें अपरिहार्य आहेत, असा साऱ्या जगाचा अनुभव आहे; तेव्हां केवळ शरीराचा नाश म्हणजे वध या कल्पनेनेंच गांगरून जाण्याचें कारण नाहीं, असा विचार सामान्य समजुतींना अनुसरून त्यानें सांगितला. या विचारानें केवळ वध म्हणजे अनर्थ ही अर्जुनाची कल्पना गेली असली, तरी त्याच्या मनःस्थितीला अनुसरून स्वतःचा वध होणें हेंच बरें असें जें त्याला वाटत होतें, त्याला त्या विचारानें पुष्टिच मिळाली. म्हणजे कृष्णाला काय पाहिजे होतें तें मिळालें नाहीं म्हणून आत्म्याच्या अमरत्वाच्या जोडीला स्वधर्माचरणाचें दुसरें तत्त्व हातीं घेणें कृष्णाला अवश्य वाटलें. 'स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि। धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते' ॥ (२,३१) अथचेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि। ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि'। (२,३३) या शब्दांनीं धर्माचें घोडें कृष्णानें पुढें ढकललें. या ठिकाणीं धर्म शब्दाचा अर्थ स्नानसंध्यादि वैयक्तिक आचार असा नसून समाजधारणासाठीं समाजाच्या घटकांना लावून दिलेलीं कर्तव्यें असा आहे हें उघड आहे. स्वधर्माच्या जोडीला कीर्ति शब्द योजून गीताकारानें आपला आशय स्पष्ट केलेला दिसतो. समाजनिरपेक्ष असें कांहीं तरी वैयक्तिक कर्म करण्याचें कोणीं टाळलें, तर समाजाचा रोष होण्याचें कारण नसतें. परंतु समाजहिताच्या दृष्टीनें अवश्य असें कार्य टाळलें किंवा अकार्य असें कांहीं केलें, तर तसें करणारी व्यक्ति निंदेला म्हणजे अकीर्तीला पात्र होते. समाजहितासाठीं अवश्य तेव्हां युद्ध करणें हें क्षत्रियाची भूमिका घेतलेल्या व्यक्तीला अवश्यच आहे. तें न करणें म्हणजे अधर्म, अर्थात् पाप होय, असा कृष्णाचा धर्मदृष्टीचा कोटिक्रम आहे.

समाजहितासाठीं त्यांतील व्यक्तींना घालून दिलेलीं कर्तव्यें त्यांनीं पाळावीं म्हणून कांहीं व्यवस्था करणें अवश्य असतें. विचारी मनुष्य स्वतःच्या अधर्माबद्दल स्वतःला शासन करूं शकतो. कै. रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी यांची विद्यार्थिदशेंतली अशी एक गोष्ट सांगतात कीं, रोज अमुक एक इतकें वाचन झालें पाहिजे असा नियम त्यांनीं स्वतःला लावून घेतला होता आणि जर एखाद्या दिवशीं



अनुक्रमणिका

कांहीं कारणास्तव तितका भाग वाचून झाला नाहीं, तर झोंपीं जाण्यापूर्वीं सर्व दिवसाच्या कामगिरीचा आढावा घेतांना, ते स्वतःच्या ठिकाणीं दोन व्यक्ति कल्पून त्यांच्या संवादरूपानें झालेल्या नियमभंगाचा कबुलीजबाब स्वतःकडून काढून घेत आणि तदनुसार उरलेलें वाचन पूर्ण झाल्याशिवाय निजावयास जात नसत.

प्र.—का हो गणपतराव, आज बर्कचीं पंचवीस पानें वाचावयाचीं होतीं, तीं वाचलीं काय ?

उ.—नाहीं.

प्र.—कां बरें ?

उ.—आज दुसरें कांहीं काम निघालें व त्यांत थोडा अधिक वेळ गेला.

प्र.—मग आतां ठरींव काम पुरें करणार कीं नाहीं?

उ.—होय, करणार.

प्र.—मग उठा पाहूं; वाचा तीं पंचवीस पानें, आणि मग निजा.

उ.—होय, वाचतों. तीं वाचल्याशिवाय झोंपणार नाहीं.

प्र.—ठीक आहे, उठा तर !

अशा आशयाचा तो स्वगत व्यक्तिद्वयाचा संवाद असे असें सांगतात. याप्रमाणें स्वतःच्या चुकीचें शासन स्वतःला करण्याचें सामर्थ्य असलेले भाग्यवान् पुरुष विरला ! सामान्य जनसमूहाला तसें शासन करण्याची योजना समाजनेत्यांना करावी लागते. राजशासन ही अशा योजनांपैकीं एक होय. पण तिचें सारें समाजकार्य पुरें पडत नाहीं. मनुष्याच्या मनाच्या अनेक भावनांत भीति ही एक भावना होय, आणि ती अनेक प्रकारची असते. त्यांतील शारीरिक किंवा आर्थिक भीतीचा उपयोग विशेषतः राजशासन करून घेतें. मानसिक भीतिही मनुष्याला असते. तिचा उपयोग करून घेणें मोठ्या कौशल्याचें असतें. लोकधुरीणांची कर्तबगारी त्यांतच दिसून येते. लोकांमध्यें स्वतःच्या हिताच्या दृष्टीनें कोणत्या स्वरूपाच्या भावना उचंबळतात, त्यांचा विचार करून त्यांना अनुकूल किंवा प्रतिकूल अशा गोष्टींची लालूच किंवा भीति दाखवून स्वकर्तव्य करावयास लावण्याचें कार्य ते करीत असतात. अर्थात् या भावना मनोविकाराच्या प्रमाणानें बदलत जातात. कर्तव्यपराङ्मुख झाल्यास जेथें राजशासन पोंचूं शकत नाहीं, जेथें कीर्ति सुद्धां माणसाला बिचकवीत नाहीं, तेथें पाप व त्याचें फळ नरक यांच्या भीतीची भावना कांहीं ठिकाणीं कार्य करूं शकते. असा एक काळ होता कीं कांहीं राक्षसी वृत्तीच्या व्यक्तींखेरीज नरकाची भीति आणि स्वर्गाची लालूच सामान्य जनसमूहाला होती. गीतेंतील अर्जुनाला पाप झाल्यास नरकाची भीति वाटत होती आणि सत्कर्म झाल्यास स्वर्गाची लालूचही दिसत होती. 'संकरो नरकायैव,' (१,४२) 'उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां नरके नियतं वासो भवति' (१,४४) यांत ही त्याची भीति दाखविलेली आहे. अर्थात् अशा वृत्तीच्या संशयग्रस्त श्रोत्याला 'यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् । सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम्' । (२,३२), 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम्' (२, ३७), 'प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ' । (१६,१६), त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः' स्वर्गाची लालूच व नरकाचें भय दाखवून निःसंदेह करणें व तेणेंकरून इष्टकार्यप्रवृत्त करणें सुलभ होतें. आज या कल्पना फारशा उपयोगीं पडणाऱ्या नाहींत हें सांगावयास नकोच; पण एका काळीं त्या होत्या व म्हणून कृष्णानें आपल्या कोटिक्रमांत स्वाभाविकपणें त्यांचा उपयोग करून घेतला. आजच्या काळीं त्यांच्या जागीं देशाभिमान, स्वातंत्र्य, पारतंत्र्य, आर्थिक दुःस्थिति इत्यादि कल्पनांची कास धरावी लागेल.



म्हणजे तात्पर्य असें कीं, राजशासनाच्या ऐवजीं किंवा त्याची पुरवणी म्हणून कांहीं भावनोद्दीपक कल्पनांची आवश्यकता असते व त्यांचा उपयोग उपदेश-पात्रांच्या मनःस्थितीप्रमाणें करावा लागतो, तो प्रकार गीतेंत आढळून येतो.

आत्म्याचें अमरत्व, धर्मदृष्ट्या युद्ध करण्याची आवश्यकता, तसें न केल्यास कीर्तिनाशाची व स्वर्ग न मिळण्याची भीति हा सारा कोटिक्रम सामान्य जन-समूहांत रूढ असलेल्या कल्पनांना धरूनच केलेला आहे. पण या कल्पना गृहीत धरूनही जर अर्जुन म्हणता, कीं, कीर्तिनाशाची मला पर्वा नाहीं, किंवा स्वर्ग न मिळाला तर न मिळो बापडा; त्याची मी क्षिति बाळगीत नाहीं, तर त्यावर हा सारा कोटिक्रम पालथ्या घड्यावरील पाण्यासारखा झाला असता. असा मनुष्य समाजांत वागण्यास पात्र नाहीं. तो समाजांत जगला तर समाजाच्या उपेक्षेमुळेंच जगणार. कारण तो जर समाजाची क्षिति बाळगणार नाहीं, तर समाज तरी त्याची क्षिति कशाला बाळगील? अर्थात् अशा मनोरचनेचीं माणसें असतात हें जरी खरें, तरी तीं थोडीं व त्यांना ताळ्यावर आणावयाचेंच, तर कोटिक्रमापेक्षां दंडुक्या-चाच उपयोग कोणीही करील. ज्याला समाजांत राहावयाचें आहे, समाजापासून आपला कांहीं फायदा होतो, म्हणून आपणही समाजाच्या हिताविषयीं उदासीन राहतां कामा नये, अशी ज्याची भावना असेल, तोच कोटिक्रमयुक्त उपदेशाला पात्र असतो. बहुजनसमाजांत अशीं उपदेशपात्र माणसेंच पुष्कळ असतात आणि हें लक्षांत घेऊ-नच कोणी झालें तरी गीतेसारख्या ग्रंथाची थोरवी गात असतो. 'तदुपदिदिक्षुः सर्वलोकानुग्रहार्थमर्जुनं निमित्तीकृत्य आह भगवान्वासुदेवः' । असें गीता-भाष्यांत (२, ११) अवतरण करतांना श्रीमच्छं-कराचार्यांची हीच दृष्टि होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

तत्त्वदृष्ट्या आत्म्याचें अमरत्व, व्यावहारिक कल्पनेप्रमाणें वर्णाश्रमधर्मानुसार अवश्य म्हणून कर्तव्य ठरलेलें युद्ध करणें हें पाप नसणें, इत्यादि कल्पनांबरोबर संसार असार असल्यामुळें ऐहिक गोष्टींना कसलेंच महत्त्व न देणें, किंवा यज्ञयागादि वेदप्रेरित कर्मे करून स्वर्गादि लोकांची प्राप्ति करून घेणें किंवा परमेश्वराची अनन्य भक्ति करीत दुसऱ्या सर्व गोष्टींची सर्वथा उपेक्षा करीत राहणें अशाही कल्पना समाजांत रूढ असतात. पण यांतील कोण-तीही एखादी कल्पना सर्वस्व म्हणून पुढें ठेऊन अन्य विषय निरपेक्ष अशा रीतीनें तिच्यामागें समाजांतील व्यक्ति लागल्यास समाज रसातळास जाण्याचा मार्ग मोकळा होतो. पण समाज किंवा गीतेंत म्हटल्याप्रमाणें लोक सर्वस्वी रसातळाला जाणें ही गोष्ट सृष्टीच्या रचनेंत उद्दिष्ट म्हणून दिसत नाहीं. समाज, लोक, सृष्टि, हा प्रवाह नित्य चालावयाचा अशीच बुद्धि सर्वत्र दिसून येते. अशी बुद्धि समाजरचनेच्या बुडाशीं नसेल तर सारे धर्म, सारीं शास्त्रें निरर्थक ठरतील. शास्त्रें, उपदेश, इत्यादिकांना कांहीं सार्थक्य असेल, तर समाजाचें सातत्य ओघासच आलें. या सातत्यासाठीं सृष्टिरचनेंत अवश्य ती व्यवस्थाही केलेली आहे व शास्त्रादिकांची योजना ही त्या व्यव-स्थेंतच अंतर्भूत होते. अर्थात् गीतोपदेशाचा उद्देशही सृष्टि उलथून पाडण्याचा नसून ती चालविण्याचाच असला पाहिजे. गीतेचें रहस्य कोणी कसेंही काढो, त्यांत जर ही दृष्टि नसेल, तर त्या रहस्याचें सारें गणित चूक समजावें. मुक्तेश्वरानें गीतेला कृष्णनीति



असें म्हटलें आहे तें याच हेतूनें होय. सृष्टीचा क्रम योग्य रीतीनें चालावा म्हणून जी योजना निसर्गानें केलेली आहे, तिचें उद्धाटन करणारा गीताग्रंथ आहे, ही कल्पना मुक्तेश्वरानें गीतेला नारदनीति व विदुरनीति यांच्या जोडीला बसवून स्पष्ट केली आहे. महाभारताच्या सभापर्वांत नारदानें युधिष्ठिराला केलेला व्यावहारिक उपदेश म्हणजे नारदनीति, उद्योगपर्वांत विदुरानें दुर्योधनाला केलेला तसलाच उपदेश म्हणजे विदुरनीति आणि भीष्मपर्वांत कृष्णानें अर्जुनाला केलेला उपदेश म्हणजे कृष्णनीति व तिलाच भगवद्गीता म्हणतात असें मुक्तेश्वरानें म्हटलें आहे, तें सत्य आहे.

श्रीमच्छंकराचार्यांच्या पुढेंही धर्मोपदेशासंबंधानें हीच विचारसरणी होती. त्यांच्या मताची कोणीं कशीही पुढेंमागें ओढाताण केलेली असो, पण त्यांनीं गीताभाष्याच्या प्रस्तावनेंत ही गोष्ट इतक्या स्पष्ट व निःसंदिग्ध शब्दांत व्यक्त केली आहे कीं, त्यांच्या निश्चित मतासंबंधानें कोणाला कसलीच शंका राहूं नये. ते त्यांचे शब्द सुप्रसिद्ध आहेतच; तरी ते येथें उतरून घेणेंही अवश्य आहे. ते म्हणतात, 'स भगवान्सृष्ट्वेदं जगत्तस्य स्थितिं चिकीर्षुर्मरीच्यादीनग्रे सृष्ट्वा प्रजापतीन् प्रवृत्तिलक्षणं धर्मं ग्राहयामास वेदोक्तम् । ततोऽन्यांश्च सनकसनंदनादींनुत्पाद्य निवृत्तिलक्षणं धर्मं ज्ञानवैराग्यलक्षणं ग्राहयामास । द्विविधो हि वेदोक्तो धर्मः प्रवृत्तिलक्षणो निवृत्तिलक्षणश्च जगतः स्थितिकारणम् ।' आचार्यांनीं या तीन वाक्यांत सगळें आपल्या मताचें सार सांगितलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. परमेश्वरानें सृष्टि निर्माण केली, नंतर ती टिकवावी कशी असा विचार पुढें आला, तेव्हां त्यानें मरीचिप्रभृति प्रजापतींना उत्पन्न करून त्यांना प्रवृत्तिलक्षणधर्म लावून दिला. पुढें (एकट्या प्रवृत्तिलक्षणधर्मानें जगाची स्थिति राखण्याचें काम भागत नाहीं, असें आढळून आल्यामुळें) त्यानें सनकसनंदन आदिकरून दुसऱ्या प्रकारचे पुरुष निर्माण करून त्यांना ज्ञानवैराग्ययुक्त असा निवृत्तिधर्म सांगितला. अशा रीतीनें वेदांत सांगितलेला आणि जगाच्या स्थितीला अवश्य असा धर्म प्रवृत्तिलक्षण आणि निवृत्तिलक्षण असा दुहेरी आहे. शंकराचार्यांच्या या मताप्रमाणें पाहतां प्रवृत्तिरूप आणि निवृत्तिरूप अशा दोन्ही प्रकारचा धर्म जगाच्या स्थितीला अवश्य म्हणूनच अस्तित्वांत आला. अर्थात् जगत्स्थिति हें ध्येय असून धर्म हें त्याचें साधन होय. या विचारसरणीनेंच 'धारणाद्धर्म इत्याहुः' अशी धर्माची व्याख्या व्यासानें करून 'धर्म प्रजांचें धारण करतो' (धर्मो धारयते प्रजाः) असें त्याचें वर्णन केलें आहे. 'उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्' (३,२४) असे शब्द कृष्णाच्या तोंडीं घालण्यांत गीताकाराचाही हाच हेतु असला पाहिजे. कर्म करावयाचें तें कशा प्रकारचें, कोणत्या मार्गानें करावयाचें, म्हणजे समाजधारणेसाठीं आचरावयाच्या धर्माचें स्वरूप गीतेंत कोणत्या प्रकारचें सांगितलें आहे, याचा सविस्तर विचार स्वतंत्रपणेंच करणें युक्त असल्यामुळें आतां गीतेंतील विषयांचें दिग्दर्शन पुढें चालवूं.

गीतेचा मुख्य उद्देश जगाची स्थिति राहण्याचा मार्ग स्पष्ट करणें म्हणजे धर्मोपदेश करणें हा असल्यामुळें तींतील इतर त्या मुख्य विषयाचीं अंगें असणें स्वाभाविक आहे. मुख्य धर्म प्रवृत्तिरूप प्रथम परमेश्वरानें लावून दिला, पण तेवढयानें मूळ उद्देश




अनुक्रमणिका

ाधत नाहीं म्हणून निवृत्तिरूप धर्माची त्याला जोड देली. प्रवृत्तिरूप धर्म म्हणजे अवश्य करावयाचीं कर्तव्यें. हीं कर्तव्यें कोणत्या पद्धतीनें करावीं म्हणजे मूळ उद्देश साधेल हें सांगणें अवश्य असल्यामुळें गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सर्व व्यवहाराच्या बुडाशीं असलेल्या कल्पना म्हणजे सांख्यतत्त्वज्ञान प्रथम सांगून धर्म आचरणें म्हणजे कर्तव्यकर्म करणें कसें अवश्य आहे हें सांगितलें आणि अशा रीतीनें तत्त्वज्ञानाच्या अधिष्ठानावरून कर्तव्य करीत राहणाऱ्या पुरुषाचें स्वरूप कसें असतें तें स्थितप्रज्ञाच्या चित्राच्या रूपानें दाखविलें आहे. हें दाखवितांना तत्त्वरूपी अधिष्ठानाला योग्य तें वरिष्ठ स्थान देणें स्वाभाविकच होतें व तदनुसार 'दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय'। (२,४९) असें कृष्णानें सांगितलेंही. पण त्यापूर्वी 'हा धर्म्य संग्राम तूं करणार नाहींस, तर तुला पाप लागेल' (२,३३) 'तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः'। (२,३७) 'ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि'। (२,३८) कर्मण्येवाऽधिकारस्ते, मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि'। (२,४७) 'योगस्थः कुरु कर्माणि'। (२,४८) असें जें त्यानें सांगितलें, त्यामुळें अर्जुनाचा घोटाळा झाला व तो काढून टाकण्यासाठीं तिसऱ्या अध्यायाचा उपक्रम झालेला दिसून येतो. या अध्यायांत जगाची रचना यज्ञतत्त्वावर केली असून तदनुसार कर्तव्य करीत राहणें त्याच्या स्थितीसाठीं अवश्य आहे असें प्रतिपादन केलें आहे. या यज्ञप्रकरणाचा विचारही सविस्तर करावयाचा, तर तो स्वतंत्रपणेंच केला पाहिजे.

जगाच्या स्थितीसाठीं केलेली योजना म्हणजे जो धर्म त्याचें आचरण कसें करावें हें सांगितलें; परंतु ही गोष्ट धारंवार विसरण्यांत येते. जगाचा म्हणजे मनुष्यसमाजाचा हा स्वभावच आहे. यासाठीं त्या पद्धतीचें पुनः पुनः स्मरण करून देणें अवश्य होतें. तें स्मरण करून देण्यासाठीं सृष्टींत काय योजना केलेली आहे, तें सांगण्यासाठीं अवतारकल्पनेच्या रूपानें चवथ्या अध्यायांत विवेचन केलें आहे. या योजनेंत यज्ञाचा अंतर्भाव होत असल्यामुळें पुनः याही अध्यायांत त्यासंबंधानें विवेचन केलें असून यज्ञ किती प्रकारचा असूं शकतो व त्या प्रकारांत ज्ञानयज्ञाचें महत्त्व सर्वांत अधिक कसें आहे याचें स्पष्टीकरण केलेलें आढळतें. या अध्यायांतील यज्ञ व ज्ञान यांचाही अधिक विचार स्वतंत्रच करावा लागेल.

यज्ञ व ज्ञान यांचा विचार करीत असतां ज्ञानयज्ञ हाच सर्वश्रेष्ठ यज्ञ होय व त्या ज्ञानांत साऱ्या कर्तव्याची परिसमाप्ति होते (सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते। ४,३३) असें जें सांगण्यांत आलें, त्याविषयीं अर्जुनाचा थोडा गैरसमज झालातें दाखवून त्याच्या निरासार्थ पांचव्या अध्यायाचा उपक्रम केलेला दिसतो. कारण ज्ञानांत सर्व कर्तव्य पुरें होतें; असें झालें म्हणजे ज्ञानानंतर कर्तव्य उरत नाहीं; असें असतां तें ज्ञान कसें प्राप्त करून घ्यावयाचें हें सांगितल्यावर पुनः 'योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत' (४,४२) असेंही कृष्णानें म्हटलें. तेव्हां अर्जुनाला असा प्रश्न पडला कीं, या दोघांची सांगड कशी घालावयाची ? त्यानें ही शंका कृष्णाला विचारली व पांचव्या अध्यायांत तिचें उत्तर कृष्णानें दिलें, असा प्रकार गीतेंत दाखविला आहे. पण खरें पाहिलें तर कृष्णाच्या साऱ्या उपदेशांत 'कर्म सोडून द्यावें' असा शब्दप्रयोग कोठेंही आलेला नाहीं. उलट ठिकठिकाणीं, 'कर्मसंन्यासानें सिद्धि मिळत





अनुक्रमणिका

नाहीं (३,४), 'कोणालाही केव्हांही कांहींएक कर्म न करीत बसणें शक्य नाहीं' (३,५), 'कांहीं न करण्यापेक्षां कांहींतरी करणेंच चांगलें, म्हणून तूं ठरींव कर्तव्य करीत चल,' (३,८), 'तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर' (३,९), 'कुरु कर्मैव तस्मात्त्वं,' (४,१५) अशीच टोंचणी अर्जुनाला लाविलेली आढळते. कर्माचा संन्यास कर, म्हणजे तीं सोडून दे किंवा कर्म सोडून देणें चांगलें असें या चार अध्यायांत कोठेंही म्हटलेलें नाहीं. यास्तव अर्जुनाचा हा प्रश्न अगदीं अस्थानीं वाटतो. 'योग-संन्यस्तकर्माणं' (४,४१) या समासांत संन्यास शब्दाचा संबंध आलेला आहे ही गोष्ट खरी; पण त्यांत कर्म टाकण्याचा संबंध नसून 'अशा माणसाला कर्मे बंधनकारक होत नाहींत.' (न कर्माणि निबध्नंति) असाच निष्कर्ष काढला आहे. 'निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः'। (४,२१) या श्लोकांत कर्मसंन्यासाचा उपदेश आहेसा अर्जुनाचा समज झाला असें टीकाकार म्हणतात; परंतु तसा उपदेश त्यांत नसून कोणत्या स्थितींत कर्माची बाधा होत नाहीं, हेंच सांगितलें आहे. पण तें कसेंही असलें, तरी अर्जुनाचा तसा प्रश्न आहे व त्याला उत्तर देण्यासाठीं पुढील अध्यायाची प्रवृत्ति आहे हें उघड आहे. या उत्तरांत कर्मसंन्यास आणि कर्मयोग यांची तुलना करून दोन्ही तत्त्वतः सारख्याच योग्यतेचे असले तरी व्यवहारदृष्ट्या कर्मयोगाचें महत्त्व अधिक होय, असा निर्णय काढलेला आहे. कर्मयोगाच्या महत्त्वाचें विवेचन करीत असतां त्यांत मनाच्या स्थिरीकरणाचा प्रश्न उत्पन्न झाला व तें करण्याचा उपाय म्हणून चित्तवृत्तिनिरोधात्मक अशा योगांचा विचार करणें अवश्य वाटल्यावरून त्याचें स्वरूप सहाव्या अध्यायांत थोडेंसें सांगितलें.

याप्रमाणें गीतेच्या मुख्य विषयाचें स्वरूप दिसतें. यापुढील सारे अध्याय याच विषयाच्या उपांगांचा सविस्तर विचार करण्यासाठीं आले आहेत' त्यांत आणखी स्वतंत्र असा विषय दिसत नाहीं. सातव्यांत कृष्णानें आपलें म्हणजे ईश्वराचें स्वरूप सांगून आपली भक्ति कशी करावी हें सुचविलें आहे. 'मीच सर्वस्व आहें, व असें जो जाणतो तोच खरा ज्ञानी व असा ज्ञानी भक्तच मला अत्यंत प्रिय आहे.' असें या अध्यायांत सांगतांना अध्यात्म, अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ हे पारिभाषिक शब्द त्या विवेचनांत आल्यामुळें, त्यांच्या स्पष्टीकरणार्थ आठवा अध्याय चालू करून पुढें भक्ति आणि योग यांच्या साह्यानें मनुष्य परमेश्वराकडे पोंचतो तो कोणत्या मार्गानें हें सांप्रदायिक पारिभाषिक शब्दांनीं सांगितलें आहे व त्यांतच देवयान व पितृयाण या दोन मार्गांचें विवेचन केलें आहे. वस्तुतः या विषयांचा गीतेच्या मुख्य उद्दिष्टाशीं कांहीं संबंध नाहीं. पण धर्म किंवा तत्त्वज्ञान सांप्रदायिक पद्धतीनें मांडतांना आपल्या मताशीं फारशा विरुद्ध नाहींत, अशा जितक्या प्रचलित कल्पना घालतां येतील तितक्या घालावयाच्या ही साऱ्याच मतप्रचारक ग्रंथकारांची रीत दिसते. महाभारतांत विविध कथा, विविध माहिती, याच हेतूनें एकत्र केलेली असली पाहिजे. जी गोष्ट साऱ्या महाभारताला, तीच आपल्या विशिष्ट विषयापुरती गीतेलाही लागू आहे. अशा प्रकारच्या अनेक गोष्टी गीतेंत आल्या आहेत, म्हणूनच ती कौरव-पांडवांच्या युद्धारंभींच्या कृष्णार्जुनसंवादाच्या रूपानें प्रथम अवतरली असें धरून चाललें, तरी पुढें तिला संग्रहात्मक रूप प्राप्त झालें असें सहजच म्हणणें येतें.




अनुक्रमणिका

नवव्या अध्यायाला राजविद्याराजगुह्य असें नांव दिलेलें सांप्रत आढळतें, पण त्यांतील मुख्य विषय सांप्रदायिक भक्तीचाच आहे. सर्वव्यापी परमेश्वर तो मी, मीच सर्व सृष्टि उत्पन्न करून पुनः तिचा लयही करतों, म्हणून तूं मनःपूर्वक माझीच भक्ति कर, यज्ञयागादि कर्मांत कांहीं शाश्वत अर्थ नाहीं, माझी भक्ति हेंच शाश्वत सुखाचें साधन आहे, हें पुनः पुनः निक्षून सांगितलें आहे. पण हें सांगतांना आकुंचित सांप्रदायिक दृष्टि मात्र ठेवलेली नाहीं व व्यक्ति म्हणून कोणी अधिकारी तर कोणी अनधिकारी असा प्रकार न ठेवतां सर्वांना दरवाजा सारखा उघडा ठेविला आहे. इतकेंच नव्हे, तर इतर संप्रदाय झाले तरी ते माझ्यांत सारे समावतात असें व्यापक धोरण योजलेलें आहे. 'येऽप्यन्यदेवता भक्ताः' ( ९,२३ ), 'अपि चेत् सुदुराचारो । भजते मामनन्यभाक् ।' ( ९,३० ), 'मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ।' ( ९,३२ ) इत्यादि श्लोक याविषयीं लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. 'स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा' । ( भागवत १–४–२५ ) यांत दर्शित केल्याप्रमाणें स्त्रिया, शूद्र इत्यादिकांना असलेल्या वेदबंदीचा संबंध दाखवून आपल्या राज्यांत व्यक्ति म्हणून कोणाला बंदी नाहीं, अशी घोषणा तर यांत केली आहेच; पण इतर संप्रदयांतील लोकांचाही विरोध टाळून त्यांना आशा लावून दिली आहे. सातव्या अध्यायांत 'बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते । वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ।' ( ७,१९ ) असें वासुदेवभक्तीच्या सांपदायिक स्वरूपाचें पिळूं सोडून त्याचाच विस्तार नऊपासून बारापर्यंतच्या अध्यायांत केलेला दिसतो. अष्टधा प्रकृति व तिच्यापा होणारी सृष्टीची उत्पत्ति, मरणोत्तर जीवाला क नुसार मिळणाऱ्या गति इत्यादि विषय जे ह आलेले आहेत, ते विषयपूर्ति व अविरोध य अनुसरून आलेले आहेत. याच हेतूनें दहा अध्यायांत सृष्टींतील आपल्या प्रमुख वि तींची त्रोटक नामावलि कृष्णानें देऊन शे 'यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्त वगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ।' ( १०,४१ ) ३ ईश्वरविभूति ओळखण्याचा सामान्य नियम सांगित हा नियम सामान्यतः सर्वांना पटेल असा अस तरी त्याअन्वयें सांगितलेल्या या दहाव्या अ यांतील बऱ्याच विभूतींना सांप्रदायिक महत्त्वच अ आजच्या चिकित्सक शास्त्रीय दृष्टीच्या कसोट त्या लावण्यांत स्वारस्य नाहीं. 'नक्षत्राणामहं श ( १०,२१ ) यावर चंद्र हा नक्षत्रच नव्हे, नक्षत्रांतील माझी विभूति म्हणजे चंद्र असें म्हणतां येईल, असा प्रश्न विचारतां येईल. त 'वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः' म्हणणें सयुक्तिक असलें, तरी संप्रदायप्रवर्तना हेतूचें आहे, असेंही म्हणतां येण्यासारखें आहे. विभूति व तत्संबंधींचा सामान्य नियम सांगितल्य त्या विषयाचा उपसंहार म्हणून 'विष्टभ्याह कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ' । ( १०,४२ ) अस शेवटीं म्हटलें, त्यावरून परमेश्वराचें सारें रूप अ तरी कसें हें जाणण्याची उत्कंठा अर्जुनाला झाल ती पुरी करण्याकरितां अकराव्या अध्यायाचा उ झाला. या अध्यायांत श्रीकृष्णानें अर्जुनाला अ 'ऐश्वररूप' ( ११,३ ) दाखविलें असा वि



आला आहे. परमेश्वर सर्वव्यापी आहे हें मान्य केल्यावर सारें जग त्याच्या एका अंशांत सामावून गेलें आहे असें म्हणणें हा एक केवळ उपसिद्धांतच आहे, त्याला मोठासा कोटिक्रम करण्याची गरज आहे असें नाहीं. पण मनुष्याचा स्वभाव असा आहे कीं, तो कित्येक गोष्टी बुद्धीला पटल्या तरी तशा व्यवहारांत मानावयास सिद्ध होत नाहीं. अशा प्रसंगीं विशेषच बारकाईच्या कोटिक्रमाची गरज लागते. कारण त्यांत पटलेलीच गोष्ट प्रत्यक्ष गळीं उतरवावयाची असते. असाच प्रकार या अकराव्या अध्यायांतील विश्वरूपदर्शनाचा आहे. आणि म्हणूनच हें विश्वरूप नीट समजावें, यासाठीं दिव्य दृष्टीची आवश्यकता अर्जुनाला लागली व ती त्याला कृष्णानें दिली. या दिव्य दृष्टीविषयीं अधिक विवेचन करावयाचें तर तें स्वतंत्रच करणें इष्ट आहे. मनुष्य कोटिक्रमानें सिद्ध होणारें अवश्य सत्यही जें भितरेपणामुळें दाबून ठेवूं इच्छितो, किंवा अज्ञान वा भ्रम यांमुळें जें त्याला सुचत नाहीं तें त्याला योग्य कारणासाठीं उघड करावयास लावणें किंवा त्याचा भ्रम व अज्ञान खुबीची गोष्ट सांगून दूर करणें असा या दिव्य दृष्टिदानाचा अर्थ आहे, एवढें येथें सांगितलें म्हणजे पुरे.

दिव्य दृष्टीच्या म्हणजे खड्तर कोटिक्रमाच्या साह्यानें अर्जुनाला सृष्टिस्वरूपांतील अवघड व कटु सत्य स्पष्टपणें कळून आल्यावर, तो जेव्हां पुनः व्यावहारिक सत्याच्या भूमिकेवर आला, तेव्हां तत्त्व आणि व्यवहार यांची सांगड घालण्याचा प्रश्न त्याच्यापुढें उभा राहिला. तत्त्वनिष्ठेनें पूर्णपणें चालणें किती अवघड आहे, व्यवहारांत त्या तत्त्वाला कशी मुरड घालावी लागते, या गोष्टी त्याला कळणें अवश्य होतें. तें बाराव्या अध्यायांत अव्यक्ताची भक्ति आणि व्यक्ताची भक्ति यांच्या तौलनिक विचाराच्या रूपानें कृष्णानें त्याला सांगितलें. अव्यक्ताची अर्थात् केवलतत्त्वाची भक्ति म्हणजे सुळावरची पोळी, म्हणून व्यक्ताची अथवा व्यवहाराची कास धरणें अधिक प्रशस्त होय व तसें करणें म्हणजे काय करणें हा विषय बाराव्या अध्यायाचा आहे. मनांतून कोणाचा द्वेष करूं नये व कोणी आपला द्वेष करील असें आपलें वर्तन सामान्यतः ठेवूं नये; समाधानी वृत्ति ठेवावी आणि मग जें यथोचित दिसेल तें निःशंकपणें करून त्याचा भार देवावर ठेवावा असा त्या विवेचनाचा तात्पर्यार्थ आहे.

यापुढील अध्याय पाहिले तर ते केवळ पुरवणी म्हणून जोडलेले दिसतात. गीता ही खरा संवाद असती तर त्यांत या अध्यायांतील विषयांना स्थान मिळणें कठिणच झालें असतें. यांपैकीं तेराव्या अध्यायांत क्षेत्र म्हणजे आधिभौतिक असें शरीर आणि क्षेत्रज्ञ म्हणजे त्याचा ज्ञाता अर्थात् सर्वोतर्यामी परमेश्वर असे दोन भाग सांगून क्षेत्रांत कसला कसला अंतर्भाव होतो हें सांगितलें. क्षेत्रांत अंतर्भूत होणाऱ्या गोष्टी औपनिषदिक स्फुट विचारांत आलेल्या गोष्टींतून उचललेल्या असून तत्कालीन शारीरिक व मानसिक पृथक्करणाचें फल त्यांत दिसून येतें. यानंतर ज्ञान म्हणजे काय, ज्ञेय वस्तु कोणती, सुखदुःखाचा उगम कसा होतो, इत्यादि गोष्टी परंपरेला धरून सांगितल्या आहेत. प्रकृति आणि पुरुष म्हणजेच पूर्वी सांगितलेलीं क्षेत्र व क्षेत्रज्ञ हीं दोन अनादि तत्त्वें होत. त्यांच्या संयोगानें सर्व सृष्टीची उभारणी होते, पण पुरुष वस्तुतः अलिप्तच असतो, असा सांख्यशास्त्राचा सिद्धांत यांत गृहीत धरून व



त्याचाच जवळ जवळ अनुवाद करून प्रकृति व पुरुष अथवा क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें भिन्नत्व जो नीट जाणतो तो दुःखातीत होतो असा निष्कर्ष काढला आहे.

चौदाव्या अध्यायांत प्रकृतिपुरुषांच्या सांख्य सिद्धान्ताला धरून त्यांच्या काल्पनिक संयोगानें सृष्टीची उभारणी कशी होते हें सांगितलें आहे. प्रकृतीचे महदादि विकार, सत्त्व, रजस् व तमस् या तीन गुणांची साम्यावस्था म्हणजे प्रकृति, ही साम्यावस्था बिघडणें म्हणजे महदादि विकारांचा प्रादुर्भाव ( १४,१९ ) इत्यादि सांख्यमतांतील गोष्टी थोडी मुरड घालून यांत दिलेल्या आढळतात. सत्त्वादि तीन गुणांना यांत प्रकृतिसंभव ( १४,५; १४,१९ ) म्हणजे प्रकृतीपासून झालेले होत असें म्हटलें आहे. सांख्यमताप्रमाणें ते प्रकृतीचें रूपच होत. या तीन गुणांचीं व्यक्तावस्थेंतील कार्यें सामान्य परिभाषेला धरूनच या अध्यायांत सांगितलीं आहेत. सत्त्व ज्ञानरूप, रजस् वासनारूप आणि तमस् अज्ञानरूप होत, असा या विवेचनाचा तात्पर्यार्थ आहे. या तीन गुणांच्या पलीकडे जाणें म्हणजे प्रकृतीचें पुरुषापासून भिन्नत्व ओळखणें, अर्थात् सुख-दुःखादि द्वंद्वांपासून मुक्त होणें होय असें सांख्य-मत असून त्याचाच बहुतेक अनुवाद या अध्यायांतील गुणातीताच्या वर्णनांत आला आहे. गुणातीत पुरुष झाला म्हणजेच तो गीतेच्या भाषेंत ब्रह्मनिष्ठ झाला. त्या शाश्वत ब्रह्माचाही आधार, श्रीकृष्ण म्हणतो, मी स्वतःच आहें, म्हणून माझी भक्ति करा म्हणजे सहजच गुणातीत व्हाल असें कृष्णानें या अध्यायांत शेवटीं सांगितलें ( १६,२६ ).

सांख्यमताप्रमाणें प्रकृति एक आणि पुरुष मात्र अनंत आहेत. या अनंत पुरुषांपैकीं एकाला पुढें इतर सर्वांवरचा अधिकार देण्यांत आला व सेश्वर सांख्यमत अस्तित्वांत आलें. पुरुषांपैकीं श्रेष्ठ अर्थात् उत्तम ( सर्वांत वरचा ) तो पुरुषोत्तम होय. तो अर्थात् प्रकृतीच्या जसा पलीकडचा तसा पुरुषांहूनही उच्च. सेश्वर सांख्यमतांतील या विचाराची परिभाषा घेऊन त्या परमेश्वराची भूमिका धारण केलेल्या श्रीकृष्णानें आपलें स्वरूप पंधराव्या अध्यायांत सांगितलें. त्यांत प्रकृति व इतर अनंत पुरुष यांनाच क्षर व अक्षर पुरुष असें म्हटलें असून त्यांच्या वरच्या परमेश्वराला परमात्मा ईश्वर असें म्हटलें आहे (१५,१६) व शेवटीं पुरुषोत्तम शब्दाची पूर्वी सांगितलेली व्युत्पत्ति दिली आहे. 'यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः। अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः'॥ (१५, १८) ही ती व्युत्पत्ति होय. पुरुषोत्तमाचें हें सत्यस्वरूप जाणून तो पुरुषोत्तम म्हणजेच कृष्ण असें जो समजतो, त्यालाच खरें ज्ञान झालें म्हणावयाचें असा कृष्णाचा भावार्थ असून त्याला त्यानें अत्यंत गुह्य असें शास्त्र म्हटलें आहे. गुह्य म्हणजे झांकून ठेवण्याजोगें असा अर्थ नसून सांप्रदायिक दृष्ट्या महत्त्वाचें हें सांगावयास नकोच. नवव्या अध्यायांतील 'गुह्यतम ज्ञान' (९,१) किंवा 'राजगुह्य' (९,२) यांतील 'गुह्य' शब्दाचाही हाच प्रकार समजावा. गुह्य म्हणजे अत्यंत महत्त्वाचें एवढाच अर्थ होय व तें महत्त्वही संप्रदायदृष्ट्याच समजलें पाहिजे.

सोळाव्या अध्यायाचा विषय दैवासुरसंपत्तीचें स्वरूपकथन असा आहे. हा विषय बसविला आहे तेथें तो नेमका कसा बसतो हें सांगणें कठिणच आहे. प्रसंगोपात्त घडलेल्या महत्त्वाच्या संवादांत पुरुषोत्तमवर्णनानंतर दैवी व आसुरी संपत्तीचें वर्णन आणि तेंही कांहीं आगापिच्छा नसतां म्हणजे त्याचा कांहीं संबंध पूर्वोक्त विषयांत आलेला नसतां व त्यामुळें अर्जुनाचा कांहीं प्रश्न किंवा शंका नसतां यावें यावरूनच गीता हा ग्रंथ तत्त्वानुसारी व्यवहारमार्गदर्शक असून तो केवळ प्रसंगानें झालेल्या प्रश्नोत्तरस्वरूपाचा म्हणजे तात्कालिक महत्त्वाचा नसून नित्यस्वरूपाचा व विचारपूर्वक लिहिलेला होय असें म्हणणें भाग येतें.



या अध्यायावर श्री. रघुनाथशास्त्री कोकजे यांनीं 'उत्कर्षाचा राजमार्ग' या छोट्या पुस्तकांत सविस्तर व सुंदर टीका निबंधरूपानें लिहिली असून तींत कित्येक बाबतींत अभिनव अर्थ सुचविले आहेत. या दैवी व आसुरी संपत्तीच्या विवेचनांत शेवटीं योग्य मार्गाचें म्हणजे शास्त्रोक्त मार्गाचें शास्त्रोक्त रीतीनें आचरण करावें म्हणजे श्रेयःप्राप्ति होते, इंद्रियें अनियंत्रित ठेवून वाटेल तसें वागत जाणें हा सुखाचा मार्ग नव्हे, असें मुख्यतः सांगितलें आहे. हें दैवी व आसुरी संपत्तीचें वर्णन बहुधा सर्वमान्य होईल असें असून त्यांत दाखविलेल्या दैवी संपत्तीचा आश्रय केल्यास मनुष्याचा उत्कर्ष होण्याचा मार्ग मोकळा होईल हेंही सामान्यतः खरें आहे.

हें विवेचन करतांना 'काय करावें व काय न करावें याचा निर्णय शास्त्रावरून करावा आणि तो केल्यावर जें कर्तव्य करणें तेंही शास्त्रांत सांगितलेल्या मार्गानेंच करावें ( १६, २४ )', असें सांगितलें; पण त्यांत अर्जुनाला एक शंका आली, ती अशी कीं, शास्त्रानें ठरलेलें कर्तव्य करावयाचें हें ठीक; पण तें करतांना शास्त्रांत सांगितलेला मार्ग न स्वीकारतां श्रद्धापूर्वक दुसऱ्या मार्गानें तें केलें तर काय होईल ? तसें करणाऱ्या माणसाला काय म्हणाल, सात्त्विक, राजस, कीं तामस ? ( १७, १ ) या शंकेचें उत्तर सतराव्या अध्यायांत देण्याचा प्रयत्न केलेला आहे. चवदाव्या अध्यायांत सत्त्वादि तीन गुणांचें स्वरूप सांगितलें, त्याचाच पुनः विस्तार करून त्यांचीं अनेक उदाहरणें यांत दिलीं आहेत, आणि त्यांतच अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर सूचित केलें आहे; पण तें स्पष्टपणें मात्र दिलेलें नाहीं. किंबहुना असेंही म्हणतां येईल कीं, तें उत्तर खरोखर दिलेंच नाहीं. कारण अर्जुनाचा प्रश्न कर्तव्यकर्म श्रद्धापूर्वक करावयाचें, पण तें स्वतःच्या मार्गानें केलें तर काय म्हणाल, असा आहे; आणि त्याचें उत्तर 'श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते' ( १७,१३ ), 'अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्। असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह' ! (१७,२८) असें जर असेल, तर तें उत्तर कसलें ? 'ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः' (१७,१) असे शब्द अर्जुनाच्या प्रश्नांत आहेत. त्यांतील श्रद्धयान्विताः हा शब्द गाळून उरलेल्या प्रश्नाचें मात्र उत्तर आहे. आतां यावर असें कोणी म्हणेल कीं अर्जुनाच्या प्रश्नांत शास्त्रोक्त कर्म करण्याचा संबंध नसून मन मानेल तें करण्याचा आहे व म्हणून उत्तर बरोबर आहे. पण तसा प्रकार नाहीं. वाटेल तें कर्म, केवळ मनाला वाटतें तें, करण्याचा संबंध त्यांत असेल, तर तो प्रश्नच मुळीं अनुपपन्न आहे. कारण सोळाव्या अध्यायाच्या शेवटीं कृष्णानें 'यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः। न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्' । (१६,२३) असें आधींच सांगितलें आहे. अर्थात् तशा अर्थाच्या अर्जुनाच्या प्रश्नाला अवसरच ठेवलेला नाहीं. पण गीताकाराला सात्त्विक, राजस व तामस या स्वभावांची आणि तदनुरूप माणसांच्या हातून होणाऱ्या कर्मांची अधिक शहानिशा करावयाची होती व ती कोणत्या तरी निमित्तानें या सतराव्या अध्यायांत केलेली आहे. या गुणांचें सामान्य स्वरूप पूर्वी सांगितलें असल्यामुळें त्याची तादृश गरजही पुनः नव्हती. पण विवेचनासाठीं योजलेल्या गोष्टींचा आढावा घेतांना त्या सर्व आल्या नाहींत असें आढळल्यामुळें कांहीं तरी संदर्भ काढून त्यांची चर्चा करणें गीताकाराला अवश्य वाटलें. प्रश्नोत्तरांतील हा विरोध सोडल्यास केवळ उत्तरांतील विवेचन मान्य होणारेंच आहे. मात्र या विवेचनांत सामान्य सिद्धांत सामान्य शब्दांनीं न सांगतां उदाहरणानें सांगितला आहे; म्हणजे कर्माची व्याप्ति विशिष्ट यज्ञ-तप-दान इत्यादिकांपुरतीच घेऊन हें विवेचन केलें आहे. तथापि तें कोणत्याही कर्माला लागेल.



अठरावा अध्याय हा सर्व गीतेचा सारांशरूप किंवा उपसंहारात्मक आहे, त्यांत नवीन विषय असा कांहीं आलेला नाहीं. पहिल्या श्लोकांतील अर्जुनाचा प्रश्न संन्यास आणि त्याग यांतील भेद स्पष्टपणें सांगण्याविषयीं आहे. वस्तुतः हा प्रश्न येथें येण्याचें कारण दिसत नाहीं. तो पूर्वी दोन वेळां (३,१-२ व ५,१) यांत आलेला असून त्यांचीं सविस्तर उत्तरेंही अनेक ठिकाणीं आलीं आहेत. तिसऱ्या अध्यायांत, पांचव्यांत, तसेंच पुनः सहाव्यांत हा विषय पुनः पुनः प्रतिपादिलेला आहे. अर्थात् अठराव्यांत तो पुनः उजळणीसाठींच आला आहे हें उघड आहे. संन्यास आणि कर्मयोग यांची सांगड, कर्मयोगाची अनिवार्यता, कर्मांची त्याज्यात्याज्यता, फलासक्तीनें कर्में करणाऱ्यांना मिळणारीं फळें, कर्मसिद्धीचीं म्हणजे फलप्राप्तीचीं पांच कारणें, त्रिविध भेद, ज्ञानाचे, कर्माचे व कर्त्याचे सात्त्विकादि तीन प्रकार, तशीच तीन प्रकारची बुद्धि, तीन प्रकारची धृति, तीन प्रकारचें सुख, चातुर्वर्ण्यांतील वर्णांचे स्वभाव व कर्में, स्वकर्मानें होणारी सिद्धि, ब्रह्मप्राप्तीचा मार्ग व ब्रह्मनिष्ठाचें स्वरूप, श्रीकृष्णभक्तीची आवश्यकता, त्या भक्तीचें फल, ईश्वराचें सर्वनियंतृत्व, इत्यादि कमीअधिक प्रमाणांत पूर्वी येऊन गेलेले विषयच अठराव्या अध्यायांत आले आहेत. याप्रमाणें सर्व विषयांची पुनः थोडक्यांत उजळणी झाल्यावर त्या साऱ्या विवेचनाचें महत्त्व शेवटीं सांप्रदायिक पद्धतीनें सांगितलें आहे. त्यांतील अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे 'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु। मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे।' हा होय असें या अध्यायांत उपसंहार करतांना कृष्णानें म्हटलें असून बहुतेक त्याच शब्दांनीं तीच गोष्ट पूर्वी ९ व्या अध्यायांतही सांगितली आहे ( ९,३४;९,१–२ ).

गीता मूळ खरोखर कृष्णार्जुनसंवादरूप असो वा नसो, तिच्या मूळ स्वरूपांत पुढें भेद झाला ही गोष्ट जों जों ती अधिक वाचावी तों तों स्पष्टपणें दृष्टीस पडूं लागते. अत्यंत गुह्य असें अध्यात्मज्ञान नवव्या व दहाव्या अध्यायांत सांगितल्यावर अर्जुनाचा मोह दूर झाला असें अकराव्याच्या आरंभीं म्हटलें आहे ( ११,१ ) म्हणजे तेथें कृष्णाच्या उपदेशाचें कार्य संपलें. परंतु पूर्वी सांगितल्याप्रमाणें कांहीं विषय त्यांत आले नाहींत, ते कसे तरी आणावे यासाठीं पुढील अध्याय प्रवृत्त झाले असें म्हणावयास जागा होते; कारण पुढें अठराव्या अध्यायाच्या शेवटींही अर्जुनानें 'स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव' (१८,७३) असें पुनः म्हटलें आहेच.

—के. ल. ओगले

---




अनुक्रमणिका

मिळण्याचीही व्यवस्था व्हावी," ही सूचना अमलांत आल्यास संग्रहालयाची चौपाटी बनण्यास उशीर लागणार नाहीं ! असो.

वास्तविक मराठी ग्रंथसंग्रहालयासारखी संस्था केवळ बहुजनसमाजाच्या मदतीवर चालणें केव्हांही शक्य नाहीं. अशा संस्थांना राजाश्रय किंवा धनिक लोकांचा उदार आश्रय मिळाला पाहिजे. या दृष्टीनें पाहतां मुंबई-म्युनिसिपालिटीनें ग्रंथसंग्रहालयाला वार्षिक दीड हजार रुपये मदत देण्याचा ठराव केला आहे ही खरोखरच अत्यंत आनंदाची गोष्ट होय. मुंबई-विश्वविद्यालया-कडूनही ग्रंथसंग्रहालयाला उदार आश्रय मिळणें अवश्य आहे. मराठी ग्रंथसंग्रहालयाचा विश्वविद्यालयानें अनेक प्रकारें उपयोग करून घेतलेला असून अजूनही तो पुष्कळ प्रकारें होण्यासारखा आहे. मागें बी. ए. च्या तोंडी परीक्षा ग्रंथसंग्रहालयांत होत असत व एखादें दुर्मिळ पुस्तक मिळवावयाचें झाल्यास याच ग्रंथसंग्रहा-लयाचा विश्वविद्यालयाला आश्रय करावा लागतो. हंसांच्या मोरोपंतावरील निबंधाचें जें अलीकडे पुनर्मुद्रण विश्वविद्यालयामार्फत करण्यांत आलेलें आहे, तें याच संग्रहालयांतील प्रतीवरून होय. परंतु या गोष्टीचा सदर आवृत्तीमध्यें नामनिर्देशदेखील करण्यांत येऊं नये ही खरोखरच खेदाची गोष्ट आहे. मराठी ग्रंथसंग्रहालया-मध्यें जो जुन्या मराठी ग्रंथांचा संग्रह आहे, तसा संग्रह आतां जमवावयाचा म्हटलें तर लाख रुपये खर्च करूनही तो जमवितां येणार नाहीं. मुंबई-विश्वविद्यालयाच्या पोस्टग्रॅज्युएट विद्यार्थ्यांना या संग्रहालयाचा संशोधनार्थ उपयोग करूं द्यावा व संग्रहालयाच्या कार्यकारी मंडळावर विश्वविद्यालयातर्फे एकादा सभासद असावा, अशा अटींवर या संस्थेला विश्वविद्यालयाकडून भरींव वार्षिक देणगी मिळावी याबद्दल चालकांनीं जरूर प्रयत्न करावा, अशी आम्ही सूचना करतों. सध्याचे व्हाइस् चॅन्सलर बॅ. विठ्ठलराव चंदावरकर यांना संस्थेची परिस्थिति व महत्त्व समजावून सांगितल्यास ते या गोष्टीचा सहानुभूतिपूर्वक विचार केल्याखेरीज कधींही राहणार नाहींत, याबद्दल आम्हांला खात्री आहे.

---





अनुक्रमणिका

संपादक, मुद्रक व प्रकाशक—रामचंद्र काशीनाथ तटणीस,
श्रीलक्ष्मी-नारायण प्रेस, ३६४ ठाकुरद्वार, मुंबई २.
नाडकर्णी आणि मंडळीकरितां ३६४ ठाकुरद्वार, मुंबई येथें प्रसिद्ध केलें.





अनुक्रमणिका